# प्रस्तावना (प्रथमावृत्ति)

प्रवेशपरीक्षेच्या नवीन अभ्यासक्रमाप्रमाणें सातव्या इयत्तेमध्यें विश्वविद्यालयानें नेमलेले वेंचे व त्या वेंच्यांवरून उद्भवणारें व्याकरण शिकवावें लागत असल्यामुळें संस्कृत व्याकरणाचें ज्ञान स्थूल स्वरूपांत चौथी ते सहावी या इयत्तांमध्येंच देणें आवश्यक आहे. त्या दिशेनें व्याकरणाची विभागणी करून ' संस्कृत-भाषाप्रदीप ' ही पुस्तकमाला लिहिण्याचा विचार मनांत आला. त्याप्रमाणें पहिलीं दोन पुस्तकें १९३६ व १९३७ सालीं लिहिलीं व त्यानंतर आज तिसरें पुस्तक लिहून अध्याप्य व अध्यापक यांपुढें ठेवतांना संकल्पित कार्य तडीस गेल्यामुळें आनंद वाटत आहे. पहिल्या दोन पुस्तकांप्रमाणेंच या पुस्तकाची रचना तीन विभागांत करून विषयांची मांडणी अध्यापनशास्त्राच्या आधुनिक तत्त्वांनुसार केलेली आहे. अशा रीतीनें हें पुस्तकहि शक्य तितकें स्वयंपूर्ण करण्याचा प्रयत्न केलेला आहे.

१ **व्याकरणविभागः**—या विभागांत पहिल्या दोन पुस्तकांत देऊन उरलेला सर्व आवश्यक व्याकरण विषय १९ पाठांत दिलेला आहे. तृतीय भूत-काळ, नामधातु व पौनःपुन्यार्थक क्रियापदें यांसंबंधींचे पाठ शेवटीं दिलेले आहेत. त्यामुळें सहावींत ते पाठ शिकविणें अशक्य झाल्यास ते सातवींत घेतां येतील. आर्धधातुक काळ व अर्थ यांचीं रूपें तयार करण्याकरितां सेट्, वेट् व अनिट् हे धातूंचे विभाग जाणणें आवश्यक असल्यामुळें त्याबद्दलची माहिती प्रास्ताविक म्हणून दिली आहे. त्याचप्रमाणें रूपसिद्धीचे नियमहि दिलेले आहेत. प्रत्येक पाठावर नवीन तऱ्हेचे प्रश्न दिले असून त्यांत शक्य तितकी विविधता आणलेली आहे. शिवाय, परिशिष्टांत मुख्य मुख्य तद्धित व कृदन्त प्रत्यय आणि नामें व विशेषणें यांचीं स्त्रीलिंगी रूपें दिली असून कांहीं ज्यास्त व्याकरणसंज्ञा दिल्या आहेत. या विभागाची विशिष्ट गोष्ट ही की, यांतील पाठांची रचना व विषयाची मांडणी सहाव्या इयत्तेला उदाहरणपूर्वक पद्धतीनें शिकवून मिळालेल्या अनुभवावर आधारलेली आहे. त्याचप्रमाणें, समास व प्रयोजक क्रियापदें या पाठांत सिद्धांत-कौमुदींतील कांहीं उपयुक्त सूत्रें दिलेली आहेत.

**२ वाङ्मयविभागः**—या विभागांत गद्य, पद्य व नाट्य अशा तीनहि प्रकारचे ५० पाठ सर्वमान्य संस्कृत ग्रंथांतून निवडून दिलेले आहेत ही गोष्ट प्रत्येक पाठाचे शेवटीं दिलेल्या मूळ ग्रंथांच्या नांवावरून दिसून येईल. पाठाचा जरूर तेथे संदर्भ देऊन टीपा व विस्तृत शब्दकोशही दिलेला आहे. त्यामुळें विद्यार्थ्यांस स्वावलंबनानें अर्थ लावणें सुलभ होईल. शिवाय, प्रत्येक पाठावर पाठाचें ज्ञान दृढ व्हावें म्हणून विविध तऱ्हेचे प्रश्न दिलेले आहेत. त्याचप्रमाणें दुसऱ्या पुस्तकाप्रमाणें प्रत्येक पाठाचे शेवटीं **अमरकोशांतील** उपयुक्त श्लोक पाठान्तरकरितां दिलेले आहेत. त्यामुळें विद्यार्थ्यांचा शब्दकोश वाढण्यासहि मदत होईल. वाङ्मय पाठ ५० असल्यामुळें शिक्षकांस निवड करण्यासहि भरपूर वाव राहील.

**३ तिसरा विभागः**—यामध्यें मराठीचें संस्कृत भाषान्तर करण्याकरितां ३० उतारे दिलेले आहेत. त्यांवरील विस्तृत टीपा व शेवटील संधिनियमांचें परिशिष्ट या दोहोंचे मदतीनें संस्कृत भाषान्तर करणे सुलभ होईल. भाषान्तर कसें करावें याबद्दलच्या सूचना पहिल्या दोन पुस्तकांमध्यें केल्या असल्यामुळें या पुस्तकांत नुसतेच उतारे दिलेले आहेत.

अशा रीतीनें सर्व प्रकारच्या विद्यार्थ्यांच्या स्वतंत्र बुद्धीला वाव मिळावा व त्यांच्यामध्यें संस्कृतग्रंथवाचनाची अभिरुचि वाढावी म्हणून एकंदर विषयाची मांडणी शक्य तितकी सुबोध व आकर्षक करण्यांत आलेली आहे. पहिल्या दोन्ही पुस्तकांप्रमाणें **या पुस्तकांतील पाठहि विद्यार्थ्यांस प्रथम स्वगत वाचावयास सांगून नंतर शिक्षकांनीं त्यांचें विवरण केल्यास विद्यार्थ्यांमध्यें आत्मविश्वास व स्वावलंबन उत्पन्न होईल.**

प्रस्तुत पुस्तक लिहितांना विद्यमान व प्राचीन व्याकरणग्रंथांचा व वाङ्मय-ग्रंथांचा मला जो उपयोग झाला त्याबद्दल त्या सर्व ग्रंथकर्त्यांचा मी फार ऋणी आहें. त्याचप्रमाणे मागील दोन्ही पुस्तकांप्रमाणें या पुस्तकाचे कामींहि श्री. मो. ना. मालेराव, एम्. ए., बी. टी., व श्री. ग. र. दारशेतकर, बी. ए., बी. टी., यांनीं आपलेपणानें जी मदत केली त्याबद्दल त्यांचे आभार मानून या प्रस्तावनेला पूर्णविराम देतों.

स. रा. भट

मार्च १९३८

## प्रस्तावना ( द्वितीयावृत्ति )

प्रस्तुत आवृत्ति ही पहिल्या आवृत्तीचें पुनर्मुद्रणच आहे असें म्हणण्यास हरकत नाही. कारण मजकुरामध्यें कोणत्याहि तऱ्हेची भर घातलेली नमून किरकोळ अदलाबदल केलेली आहे इतकेंच. समास व प्रयोजक क्रियापदे यांना उपयुक्त होणारीं सूत्रें त्या त्या पाठांत न देतां व्याकरण विभागाचे शेवटीं परिशिष्ट 'इ' म्हणून दिलेलीं आहेत. त्याचप्रमाणें वाङ्मयविभागांतील पाठांचा संदर्भ पाठांनंतर न देतां आरंभी दिलेला आहे.

या पुस्तकांत एका वर्षांत शिकवितां येईल त्यापेक्षां ज्यास्त विषय असल्यामुळें पुढें सुचविल्याप्रमाणे सहाव्या इयत्तेंत पाठ घेऊन उरलेले सातवींत घेणें शक्य होईल.

**सहावी इयत्ताः—व्याकरण पाठः—पु. २ मधील उरलेले दोन पाठ व पु. ३ मधील १ ते १६; वाङ्मयपाठः—गद्य व नाट्य—१५ ते १८ पाठ आणि पद्य—१०० ते ११५ श्लोक; संस्कृत भाषान्तर—१२ उतारे.**

प्रथमावृत्तीप्रमाणे या द्वितीयावृत्तीचा शिक्षक व विद्यार्थी यांजकडून सक्रिय पुरस्कार केला जाईल अशी आशा आहे.

फेब्रुवारी १९४१ स. रा. भट

## प्रस्तावना ( तृतीयावृत्ति )

प्रस्तुत आवृत्ति ही दुसऱ्या आवृत्तीचें पुनर्मुद्रण आहे.

जुलै १९४५ स. रा. भट

# संस्कृतभाषाप्रदीप–पुस्तक ३ रें

## अनुक्रमणिका

### भाग १—व्याकरण–पाठ

# भाग २—संस्कृत-पाठ

## भाग ३ मराठी पाठ (संस्कृत भाषान्तराकरितां)

# भाग पहिला—व्याकरण-पाठ

## प्रास्ताविक माहिती

### (अ) धातूंचे सेट्, वेट् व अनिट् असे विभाग




१—गम्, हन्, भृ, युध्, चि, क्षिप्, रुध्, तन्, क्री, कथ्

२—कारय (प्र.), जिगमिष (इ.), गुणाय (ना.), बोभूय (पौ.)

३—गम्, हन्, भृ, युध्, चि, क्षिप्, रुध्, तन्, क्री

४—कथ्, गण्, तड् वगैरे आणि चकास्, दरिद्रा, जागृ इत्यादि

५—जि, स्तु, भृ, चि, मृ, कृ, क्री ( ४ व ७ गणांचे स्वरान्त एकावयवी धातु नाहींत )

६—गम्, हन्, निज्, युध्, आप्, क्षिप्, रुध्, तन्, ग्रह्

७—ऊदृदन्तैर्यौतिरुक्ष्णुशीस्नुनुक्षुश्विडीङ्श्रिभिः ।
वृङ्वृञ्भ्यां च विनैकाचोऽजन्तेषु निहताः स्मृताः ॥

८—स्वरतिः सूयते सूते पञ्चमे नवमे च धूञ् । ( वेट् )

९—७ व ८ यांतील धातु वगळून इतर सर्व एकावयवी स्वरान्त धातु.

१०—११ व १२ यांतील धातु वगळून इतर एकावयवी व्यंजनांत धातु.

११—अक्षितक्षी त्वक्षि तञ्च् व्रश्चञ्जी तञ्जि मार्जेति ।
मार्ष्टि क्लिदि स्यन्दि सिध् रध् गुप् त्रप् तृप् दृप् क्लृपः क्लिशिः ॥

क्षास्यति क्षमते नश्यत्यश्नुते गृहि गाहि च ।
गुहू तृंहू तृह्व द्रुह्य मुह्य स्तृहि स्निहिस्तथा ॥
स्नुह्यतिर्बृंहतीत्येते द्वात्रिंशद् वेट् हि धातवः ।

१२—शक्लृ पच् मुचि रिच् वच् विच् । सिच् प्रच्छि त्यज् निजिर् भजः ।

भञ्ज् भुज् भ्रस्ज् मस्जि । यज् युज् रुज् । रञ्ज् विजिर् स्वञ्जि सञ्ज् सृजः ॥
अद् क्षुद् खिद् छिद् । तुदि नुदः । पद्य भिद् विद्यतिर् विनद् ।
शद् सदी स्विद्यतिः स्कन्दि । हदी क्रुध् क्षुधि बुध्यती ॥
बन्धिर् युधि रुधी राधि । व्यध् शुधः साधि सिध्यती ।
मन्य हन्नाप् क्षिप् छुपि तप् । तिपस्तृप्यतिदृप्यती ॥
लिप् लुप् वप् शप् । स्वप् सृपि यभ् । रभ् लभ् गम् नम् । यमो रमिः ।
क्रुशिर् दंशि दिशी दृश् मृश् । रिश् रुश् लिश् विश् । स्पृशः कृषिः ॥
त्विष् तुष् द्विष् दुष् । पुष्य पिष् विष् । शिष् शुष् श्लिष्यतयो घसिः ।
वसतिर् दह् दिहि दुहो । नह् मिह् रुह् लिह् वहिस्तथा ॥
अनुदात्ता हलन्तेषु धातवो द्व्यधिकं शतम् ॥

## कारिकांचे अर्थ व त्यांतील धातु

७ (दीर्घ) ऊकारान्त, (दीर्घ) ॠकारान्त, यु ( २ प. ) – जोडणें, रु ( २ प. )–ओरडणें, क्ष्णु (२ प.)–धार लावणें, शी ( २ आ. )–झोपणें, स्नु

( २ प. ) पाझरणें, नु ( २ प. )–स्तुति करणें, क्षु ( २ प. ) शिंकणें, श्वि ( १ प. )–फुगणें, डी ( १ आ. )–उडणें, श्रि ( १ उ. )–आश्रय करणें, वृ ( ५ उ. )–आच्छादणें, वृ ( ९ आ. )–सेवा करणें, ह्या एकावयवी स्वरान्त धातूंशिवाय इतर 'अनिट्' होत; म्हणजे वरील धातु **सेट्** होत.

८ स्वृ ( १ प. )–आवाज करणे, सू ( २–४ आ. )–जन्म देणें, धू ( ५–९ उ. )–हालवणें, हे एकावयवी स्वरान्त धातु **वेट्** होत.

११ या कारिकांतील एकावयवी व्यंजनान्त धातु **वेट्** होत.

अक्ष् ( १. ५ )–व्यापणें
तक्ष्–त्वक्ष् ( १. ५ प.)–कापणें
तञ्च्-तञ्ज् ( ७ प. )–आकुंचित होणें
व्रश्च् ( ६ प. ) कापणें
अञ्ज् ( ७ प. )–लेप देणे.
मृज् ( १. २ प. )–स्वच्छ करणें
क्लिद् ( ४ प. )–भिजणें
स्यन्द् ( १ आ. )–गळणें, पडणें
सिध् ( १ प. )–हुकूम करणें
रध् ( ४ प. )–ठार मारणें
गुप् ( १ प. )–रक्षण करणें
त्रप् ( १ आ. )–लाजणें
तृप् ( ४ प. )–संतुष्ट होणे
दृप् ( ४ प. )–गर्विष्ठ होणें
कृप् ( १ आ. )–योग्य असणे

क्लिश् ( ९ प. )–त्रास देणें
क्षम् ( ४ प. १ आ. )–क्षमा करणें
नश् ( ४ प. )–नाश होणें
अश् ( ५ आ. )–व्यापणें
गृह् ( १ आ. )–पकडणे
गाह् ( १ उ. )–शिरणे
गुह् ( १ उ. )–झाकणें, लपवणें
तृह्-तृंह् ( ६ प. )–ठार मारणे
द्रुह् ( ४ प. )–द्रोह करणें.
मुह् ( ४ प. )–मूर्च्छा येणें
स्तृह् ( ६ प. )–ठार मारणें
स्निह् ( ४ प. )–स्नेह करणे
स्नुह् ( ४ प. )–ओकणें
वृह् ( ६ प. )–काम करणे

१२ या कारिकांतील एकावयवी स्वरान्त १०२ धातु अनिट् आहेत.

शक् ( ५ प. )–समर्थ असणें
पच् ( १ उ. )–शिजवणे
मुच् ( ६ उ. )–सोडणे
रिच् ( १ प. ७ उ. )–रिकामा करणे

वच् ( २ प. )–बोलणें
विच् ( ७ उ. )–वेगळें करणे
सिच् ( ६ उ. )–शिंपडणें
प्रच्छ् ( ६ प. )–विचारणे

त्यज् ( १ प. )–टाकणें
निज् ( ३ उ. )–धुणें
भज् ( १ उ. )–भजणें
भञ्ज् ( ७ प. )–मोडणें
भुज् ( ६ प. )–मोडणें
( ७ आ. ) खाणें. ( ७ उ. )–रक्षणें
भ्रस्ज् ( ६ उ. )–भाजणें
मस्ज् ( ६ प. )–बुडणें
यज् ( १ उ. )–पूजा करणें
युज् ( १ प. ७ उ. )–जोडणें
रुज् ( ६ प. )–मोडणें
रञ्ज् ( १–४ उ. )–लाल होणें
विज् ( ३ उ. )–विभक्त करणें
स्वञ्ज् ( १ आ. )–आलिंगणें
सञ्ज् ( १ प. )–चिकटणें
सृज् ( ६ प. )–सोडणें
अद् ( २ प. )–खाणें
क्षुद् ( ७ उ. )–कुटणें
खिद् ( ४, ७ आ. ६ प. )– दुःखी होणें
छिद् ( ७ उ. )–तोडणें
तुद् ( ६ उ. )–त्रास होणें
नुद् ( ६ उ. )–पुढें ढकलणें
पद् ( ४ आ. )–जाणें
भिद् ( ७ उ. )–फुटणें
विद् ( ४ आ. )–असणें
( ७ आ. )–चर्चा करणें
शद् ( १ आ. )–नाश पावणें
सद् ( १–६ प. )–खचून जाणें

स्विद् ( ४ प. )–घाम येणें
स्कन्द् ( १ प. )–जाणें
हद् ( १ आ. )–विष्ठा टाकणें
क्रुध् ( ४ प. )–रागावणें
क्षुध् ( ४ प. )–भूक लागणें
बुध् ( ४ आ. )–जागें होणें
बन्ध् ( ९ प. )–बांधणें
युध् ( ४ आ. )–लढणें
रुध् ( ४ आ. )–आज्ञा पाळणें
( ७ उ. )–वेढणें
राध् ( ४ प. )–तयार असणें
( ५ प. )–साधणें
व्यध् ( ४ प. )–वेध करणें
शुध् ( ४ प. )–शुद्ध होणें
साध् ( ५ प. )–साध्य करणें
सिध् ( ४ प. )–यशस्वी होणें
मन् ( ४ आ. )–विचार करणें
हन् ( २ प. )–ठार मारणें
आप् ( ५ प. )–मिळवणें
क्षिप् ( ४ प. ६ उ. )–फेकणें
छुप् ( ६ प )–स्पर्श करणें
तप् ( १ प. ४ आ. )–तप करणें
तिप् ( १ आ. )–गळणे
तृप् ( ४ प. )–संतुष्ट होणें
दृप् ( ४ प. ) गर्विष्ठ होणें
लिप् ( ६ उ. )–लेप देणें
लुप् ( ६ उ. )–लुटणें
वप् ( १ उ. )–पेरणें
शप् ( १ प. )–शाप देणें

स्वप् ( २ प. )–झोपणें
सृप् ( १ प. )–सरपटत जाणें
यभ् ( १ आ. )–संग करणें
रभ् ( १ आ. )–आरंभ करणें
लभ् ( १ आ. )–मिळवणें
गम् ( १ प. )–जाणें
नम् ( १ प. )–नमस्कार करणें
यम् ( १ आ. )–नियंत्रण ठेवणें
रम् ( १ आ. )–खेळणें
क्रुश् ( १ प. )–ओरडणें
दंश् ( १ प. )–चावणें
दिश् ( ६ उ. )–दाखवणें
दृश् ( १ प. )–पाहणें
मृश् ( ६ प. )–विचार करणें
रिश्-रुश् ( ६ प. )–ठार मारणें
लिश् ( ६ प. )–जाणे
विश् ( ६ प. )–शिरणें
मिह् ( १ प. )–भिजवणे
वह् ( १ उ. )–उचलणें
स्पृश् ( १ प. )–स्पर्श करणे
कृष् ( १ प. ६ उ. )–ओढणें, नांगरणें
त्विष् ( १ उ. )–चकाकणें
तुष् ( ४ प. )–संतुष्ट होणें
द्विष् ( २ उ. )–द्वेष करणे
दुष् ( ४ प. )–बिघडणें
पुष् ( ४ प. )–पोसणें
पिष् ( ७ प. )–दळणें
विष् ( ३ उ. )–पसरणें
रुह् ( १ प. )–वाढणें
शिष् ( ७ प. )–वेगळें करणें
शुष् ( ४ प. )–सुकणें
श्लिष् ( ४ प. )–आलिंगन देणें
घस् ( १ प. )–खाणें
वस् ( १ प. )–राहणें
दह् ( १ प. )–जळणें
दिह् ( २ उ. )–लेप देणें
दुह् ( २ उ. )–दूध काढणें
नह् ( ४ उ. )–बांधणें
लिह् ( २ उ. )–चाटणे

## ( आ ) रूपसिद्धीला उपयुक्त सन्धिनियम

१ एखाद्या रूपाच्या शेवटी एकाहून अधिक व्यंजनें आल्यास, पहिलें कायम ठेवतात व इतरांचा लोप करतात. जसें—मरुत्+स्–मरुत् ( प्रथमा एकवचन ). अपवाद—र्क्, र्ट्, र्त्, र्प्.

२ रूपाच्या शेवटील अनुनासिकाशिवाय इतर वर्गव्यंजनांबद्दल त्याच वर्गाचें प्रथम किंवा तृतीय व्यंजन येतें. जसे—मरुत्–द्, वाक्–ग्.

३ प्रत्ययांचा आद्य स्वर, अर्धस्वर किंवा अनुनासिकें यांपूर्वी शब्दाचें अन्त्य

मूळ व्यंजन कायम राहतें. जसें—शशिन्+अस्–शशिनः, रुन्ध्+वः–मः–रुन्ध्वः–रुन्ध्मः ।

४ प्रत्ययांच्या आद्य कठोर व्यंजनांपूर्वी मागील अनुनासिकाशिवाय इतर वर्गव्यंजनाबद्दल त्याच वर्गाचें प्रथम व्यंजन येतें. जसें—समिध्+सु–समित्सु.

५ प्रत्ययांच्या आद्य मृदु व्यंजनांपूर्वी मागील अनुनासिकाशिवाय इतर वर्गव्यंजनांबद्दल त्याच वर्गाचें तृतीय व्यंजन येतें. समिध्+भ्याम्–समिद्भ्याम् ।

६ प्रत्ययांच्या आरंभीं अर्धस्वर व अनुनासिकें यांशिवाय इतर व्यंजनें असल्यास अथवा कोणताहि प्रत्यय पुढें नसल्यास (पहिल्या नियमानुसार लोप झाल्याकारणानें) धातूंच्या अथवा नामांच्या अंगाच्या अन्त्य व्यंजनांचा पुढें लिहिल्याप्रमाणें फरक होतो.

अन्त्य क्, ख्, ग्, घ्, च्, स्ज् यांचा 'क्' होतो; अन्त्य ट्, ठ्, ड्, ढ् यांचा 'ट्'; अन्त्य त्, थ्, द्, ध्, यांचा 'त्', अन्त्य प्, फ्, ब्, भ् यांचा 'प्'; व अन्त्य श्, क्ष्, व छ् यांचा 'ष्' होतो.

परंतु

(अ) सृज्, मृज्, यज्, राज्, भ्राज्, यांच्या अन्त्य 'ज्' चा 'ष्' होतो.

(आ) दिश्, दृश्, स्पृश्, याच्यापुढें नामांना लागणारा प्रत्यय आल्यास अथवा कांहीं न आल्यास 'श्' चा 'क्' होतो, आणि इतर वेळेला 'ष्' होतो.

(इ) वरील ठिकाणीं नश् च्या 'श्' चा 'ष्' किंवा 'क्' होतो. जसें—(अ) मृज्+तः–मृष्+तः। (आ) दिश्+सु–दिक्+सु। दिश्+त–दिष्+त। (इ) नश्+स्यति–नष्+स्यति। नश्+त–नष्+त।

७ अन्त्य क्, ट्, त्, प् यांच्यापुढें अर्धस्वर व अनुनासिकें यांशिवाय अन्य

मृदु व्यंजनांनीं आरंभ-झालेला प्रत्यय आल्यास त्यांचा अनुक्रमें ग्, ड्, द्, ब् होतो. जसें—दिश्+भ्याम्–दिक्+भ्याम् (६ आ.)–दिग्+भ्याम् ।

८ एकाच शब्दाच्या रूपामध्यें ऋ, र्, व ष् यांच्यापुढें 'न्' हें व्यंजन आल्यास 'न्' चा 'ण्' होतो. हा फरक 'ऋ, र्, ष् आणि न्' यांच्यामध्यें स्वर, अर्धस्वर (ल् शिवाय), ह्, कवर्ग व पवर्ग यांचें व्यंजन आलें असतांनाहि होतो. मात्र 'न्' रूपाच्या शेवटीं असूं नये. जसें—हरि + ना – हरिणा. परंतु हरीन्.

९ प्रत्ययाच्या आद्य 'स्' चा 'ष्' होतो, मात्र त्या 'स्' पूर्वी अ–आ शिवाय स्वर, कवर्गाचें व्यंजन, र् किंवा ह् यांपैकीं वर्ण असला पाहिजे. हे वर्ण व स् यांमध्यें अनुस्वार किंवा विसर्ग आल्यास चालेल. जसें—वाच् + सु – वाक् + सु (६) – वाक् + षु ।

१० (अ) अन्त्य ष् पुढें स् हा आद्य वर्ण असलेला धातुप्रत्यय आला तर ष् चा क् होतो, मात्र त्या स् चा नि. १ प्रमाणें लोप होतां कामा नये. जसें—मृज् + सि–मार्ज् + सि–मार्ष् + सि (६ अ)–मार्क् + सि ।

(आ) अन्त्य ष् हा त्–थ् हे आद्य वर्ण असलेल्या प्रत्ययांपूर्वी तसाच राहतो. जसें—मृज् + तः – मृष् + तः (६ अ) ।

(इ) अन्त्य 'ष्' चा इतर सर्व ठिकाणीं 'ट्' किंवा 'ड्' होतो. जसें—अ + मार्ज् + स् – अमार्ष् + स् – अमार्ष् (१) – अमार्ट् – ड् ।

११ तवर्ग किंवा स् आणि टवर्ग किंवा ष् यांचा सन्धि करितांना तवर्गाच्या व्यंजनांबद्दल अनुक्रमें टवर्गाचीं व्यंजनें येतात व स् बद्दल ष् येतो. जसें—मृज् + तः – मृष् + तः (६ अ) – मृष् + टः ।

१२ अन्त्य ह् चा, लोप न होणाऱ्या व स् हा आद्य वर्ण असणाऱ्या प्रत्ययांपूर्वी क् होतो; व इतर ठिकाणीं अथवा नामप्रत्ययांपूर्वी घ् होतो, मात्र शब्दाचा आद्य वर्ण द् पाहिजे व इतर आद्य वर्ण असेल तर ढ् होतो, जसें—दुह् + सि – दोक् + सि । दुह् + ति – दोघ् + ति । लिह् + सि – लेक् + सि । लिह् + ति – लेढ् + ति ।

१३ अन्त्य घ्, ध्, भ् पुढें त् किंवा थ् हे आद्य वर्ण असलेले प्रत्यय आले तर त्यांचा ग्, द्, व ब् होतो, आणि त् किंवा थ् यांचा ध् होतो. जसें—दोघ्+ति – दोग + धि । रुणध् + ति – रुणद् + धि ।

१४ अन्त्य ढ् पुढें त् – थ् – ध् यांपैकीं वर्ण प्रत्ययांच्या आरंभीं आल्यास ढ् चा लोप होतो व ऋ शिवाय मागील इतर स्वर दीर्घ होतो, आणि त् – थ् – ध चा ढ् होतो. जसें—लेढ् + ति – लेढ् + ढि – लेढि ।

१५ शब्दांच्या आरंभी ब्, ग्, द् व अन्त्य वर्ण घ्, ढ्, भ्, ध् किंवा ह् असेल आणि जेव्हां पुढें कोणताहि वर्ण नसेल किंवा स् – ध् हे प्रत्ययांचे आद्य वर्ण असतील, तर आद्य ब्, ग्, द् यांचे फरक अनुक्रमें भ्, घ्, ध् असे होतात. अ + दोह् + स् – अधोघ् + स् – अधोक् – ग् ( २ ) ।

१६ प्र. भूतकाळच्या स् व त् या प्रत्ययांचा नि. १ प्रमाणें लोप केला असतां अंगाच्या अन्त्य त्, थ्, द्, ध् व स् बद्दल द्वि. पु. एकवचनांत त् – द् किंवा स् येतो व तृ. पु. एकवचनात त् किंवा द् येतो. अवेद् + स् – अवेः-त् – द् । अवेद् + त् – अवेत् – द् ।

१७ धातूच्या अन्त्य 'स्' चा द्वितीयपुरुषी 'ध्' नें आरंभ होणाऱ्या प्रत्ययां-पूर्वीं लोप होतो. आस् + ध्वे – आध्वे ।

१८ ए, ऐ, ओ व औ यांपुढें स्वर आला तर त्यांचे अनुक्रमें अय्, आय्, अव् व आव् असे फरक होतात. अजुहो + अम् – अजुहव् + अम् ।

१९ मूळ धातूच्या अन्त्य इ-ई पूर्वीं जर संयुक्त व्यंजन असेल तर अपित् अजादि प्रत्ययांपूर्वीं 'इय्' असा फरक होतो. ह्री – जिह्री + अति – जिह्रिय् + अति ।

२० मूळ धातूच्या अन्त्य उ-ऊ चा अपित् अजादि प्रत्ययांपूर्वीं 'उव्' होतो. नु + अन्ति – नुव् + अन्ति ।

# पाठ १

## द्वितीयभूतकाळ ( परोक्षभूतकाळ )

१ दिलीपपुत्रो रघुर्नयेन राज्यं चकार पृथिवीं च यथान्यायं शशास । रघुपुत्रोऽजोऽपि पितरमनुचकार शौर्येण धैर्येणौदार्येण च । यदा स यौवनपदवीमारुरोह तदा स इन्दुमतीं परिणिनाय । पश्चाद्वृद्धत्वं गतो रघुरजं राज्येऽभिषिषेच । अरण्यं गन्तुमुद्यतः स पुत्रस्यानुनयेन तं विचारं तत्याज । अतो नगराद्बहिरेवाश्रमे स्थित्वा कालेन त्रिदिवं जगाम ।

वरील उताऱ्यांत योजलेल्या क्रियापदांचा अर्थ भूतकाळी असून फार प्राचीन क्रिया वर्णिलेली आहे. त्याचप्रमाणें ही रूपें त्याच धातूंच्या प्रथमभूतकाळी रूपांहून भिन्न आहेत. म्हणून या रूपांना **द्वितीयभूत**काळी किंवा **परोक्षभूत**-काळी रूपें असें म्हणतात. ज्या अर्थी यांचा उपयोग फार प्राचीन काळची क्रिया दर्शविण्याकरितां केला जातो त्या अर्थी बहुधा तृतीयपुरुषी रूपेंच उपयोगांत आलेलीं दिसतात. इतर पुरुषी रूपांचा उपयोग फार क्वचित् होत असल्यामुळें तीं तिसऱ्या पाठांत दिली आहेत. म्हणून द्वितीयभूतकाळाचीं तृतीयपुरुषी रूपेंच शिकणें आवश्यक आहे.

**चकार, शशास, अनुचकार, आरुरोह, परिणिनाय, अभिषिषेच, तत्याज व जगाम** या रूपांकडे पाहिल्यास असे दिसून येईल की धातूंच्या आद्य स्वराचें किंवा आद्य व्यंजनयुक्त स्वराचें द्वित्व झाले आहे. हें द्वित्व करण्याचे नियम बहुतेक तृतीय गणाच्या अभ्यासाच्या नियमांप्रमाणे आहेत; कांहीं ठिकाणीं मात्र फरक आहे.

## अभ्यासाचे नियम

१ दा–ददा । नी–निनी । डी–डिडी । दु–दुदु । यु–युयु । फल–पफल । धा–दधा । हु–जुहु । खन्–चखन् । कृ–चकृ । भृ–बभृ । जॄ–जजॄ । पॄ–पपॄ । गै–गा–जगा । दो–दा–ददा । सो–सा–ससा

दीर्घ स्वर ऱ्हस्व होतो, द्वितीय व चतुर्थ वर्गव्यंजनांबद्दल त्याच वर्गाचीं प्रथ[illegible] व तृतीय व्यंजनें अनुक्रमें येतात, ह् बद्दल ज् व कवर्गव्यंजनांबद्दल चवर्गव्यंज[illegible] येतात, ऋ-ॠबद्दल अ येतो व ए, ऐ, ओ या अन्त्य स्वरांबद्दल प्रथम 'आ' करून नंतर 'आ' चा 'अ' होतो.

ज्ञा–जज्ञा । त्रै–तत्रा । ग्लै–जग्ला । ह्री–जिह्री । श्रि–शिश्री । स्मृ–सस्मृ । ग्रह्–जग्रह् । क्रुश्–चुक्रुश् । स्तृ–तस्तृ । स्पृश्–पस्पृश् ।

आद्य जोडाक्षरांतील पहिल्या व्यंजनाचा पुढील स्वरासह अभ्यास करावा, परं[illegible] जोडाक्षरांतील पहिलें व्यंजन ऊष्मवर्ण असून दुसरें कठोर असेल तर कठो[illegible] व्यंजनाचा पुढील स्वरासह अभ्यास होतो.

टीपः— याला अपवाद

स्वप्–स्वस्वप् ( सुष्वप् ) व्यध्–व्यव्यध् ( विव्यध् ) । ज्या–ज्याज्य (जिज्या) । व्यच्–व्यव्यच् (विव्यच्) । व्ये–व्येव्ये ( विव्ये ) । ह्वे(हु)-जुहु । श्वि ( शु )–शुशु ।

वरील धातु संप्रसारण घेणारे आहेत. त्यांचें द्वित्व करतांना जोडाक्षरासहि[illegible] स्वराचें द्वित्व केलेलें आहे व नंतर संप्रसारण झालें आहे, परंतु ह्वे व श्वि यां[illegible] प्रथम संप्रसारण करून नंतर द्वित्व केलेलें आहे.

## रूपसिद्धि

२ वरील दतान्यांतील रूपें तृतीयपुरुषी एकवचनी असून परस्मैपदी आहेत.

चकार—कृ–चकृ + अ–चकार् + अ ।

**निनाय—नी–निनी + अ –निनै ( निनाय् ) + अ ।**

अन्त्य स्वराला परस्मैपदी 'अ' या तृ. पु. एकवचनी प्रत्ययापूर्वी वृद्धि होते.

**रुरोह—रुह्–रुरुह् + अ – रुरोह् + अ ।**

**सिषेच—सिच्–सिषिच् + अ –सिषेच् + अ ।**

'अ' शिवाय उपान्त्य ह्रस्व स्वराचा तृ. पु. ए. वचनी 'अ' या प्रत्ययापूर्वी गुण होतो.

**जगाम—गम्–जगम् + अ –जगाम ।**

**तत्याज—त्यज्–तत्यज् + अ – तत्याज ।**

उपान्त्य 'अ' ची तृ. पु. ए. वचनी 'अ' या प्रत्ययापूर्वी वृद्धि होते.

**टीपः—परस्मैपदी तृ. पु. ए. वचनी प्रत्यय 'अ' हा पित् आहे.**

**४ यदा रामलक्ष्मणौ वनं प्रविविशतुस्तदा सर्वे मुनयो मुमुदिरे । ते रामं सानन्दं तुष्टुवुः । लक्ष्मणस्य पराक्रमं दृष्ट्वा रामो मुमुदे । रामलक्ष्मणौ तेजसा शुशुभाते ।**

वरील वाक्यांत **विविशतुः, तुष्टुवुः** । हीं प. पदी तृ. पु. द्वि. वचनी व बहुवचनी रूपें आणि **मुमुदे, शुशुभाते, मुमुदिरे** हीं आ. पदी तृ. पु. सर्व रूपें योजलेलीं आहेत.

**विविशतुः—विश्–विविश् + अतुः । तुष्टुवुः—स्तु – तुष्टु + उस् – तुष्टुव् + उः । मुमुदे—मुद् – मुमुद् + ए । शुशुभाते— शुभ् – शुशुभ् + आते । मुमुदिरे—मुद् – मुमुद् + इरे ।**

वरील पृथक्करणावरून असें दिसून येईल कीं ( १ ) परस्मैपदी तृ. पु. द्वि. वचनी प्रत्यय **अतुस्** व बहुवचनी प्रत्यय **उस्** आहे आणि आत्मनेपदी तृ. पु. प्रत्यय **ए–आते–इरे** हे आहेत. ( २ ) हे प्रत्यय '**अपित्**' आहेत. कारण यापूर्वी अन्त्य स्वर अथवा उपान्त्य ह्रस्व स्वर यांना गुण किंवा वृद्धि फरक झालेला नाहीं.

तृ. पु. प्रत्ययः—प. पदी–अ **अतुस् उस्** । आ. पदी–ए **आते इरे** ।

टीप.—सृज्, दृश्, मुच्, वृत्, वृध्, रुच्, युज्, भुज्, इ. धातूंचीं रूपें वरीलप्रमाणें कांहीं फरक न होतांच होतील. (परस्मैपदी तृ. पु. एकवचनी रूपाशिवाय).

५ **लवकुशौ रामं पितेति नाभिजज्ञाते। (न अभिजज्ञाते)**

**रघुरध्वर्युभ्यो दक्षिणां ददौ।**

**अभिमन्युवधेन पाण्डवाः सशोका बभुः।**

**वामनो बलिमूर्ध्नि स्वपदं निदधे।**

अभि + जज्ञाते—ज्ञा–जज्ञा + आते – जज्ञ् + आते। ददौ—दा – ददा + औ – दद् + औ।

(१) आकारान्त धातूंचा तृ. पु. ए. वचनी प. पदी प्रत्यय 'औ' आहे व

(२) अंगाच्या अन्त्य 'आ' चा प्रत्ययापूर्वी लोप होतो.

६ **नारदो विष्णुस्तुतिं जगौ। रामः प्रजास्तत्रे। पुत्रस्य मृत्युना जनकस्य सर्वा आशा अवससुः: सन्ध्याकाले कमलानि मम्लुः।**

जगौ—गै – गा – जगा...। तत्रे—त्रै – त्रा – तत्रा...। अवससुः—सो – सा – ससा...। मम्लुः—म्लै–म्ला–मम्ला...।

ए, ऐ, ओ व (औ) हे अन्त्य स्वर असणारे धातु आकारान्त समजून चालवावे.

## स्वरान्त धातूंचीं रूपें (तृतीयपुरुषी)

**या**–ययौ ययतुः ययुः। **मा**–ममे ममाते ममिरे। आकारान्त व ए, ऐ, ओ हे अन्त्य स्वर असणारे धातु 'या' प्रमाणे प. पदामध्यें व 'मा' प्रमाणे आ. पदामध्यें चालवावे.

**श्रि** (उ. प.) शिश्राय शिश्रियतुः शिश्रियुः। शिश्रिये शिश्रियाते शिश्रियिरे।

**स्मि** (आ. प.)–सिष्मिये सिष्मियाते सिष्मियिरे।

**इ** (प. प.)–इयाय ईयतुः ईयुः।

अधि + इ (प. प.)–अधीयाय अधीयतुः अधीयुः।

अधि + इ ( आ. प. )–अधिजगे अधिजगाते अधिजगिरे ।

नी ( उ. प. )–निनाय निन्यतुः निन्युः । निन्ये निन्याते निन्यिरे ।

डी ( आ. प. )–डिड्ये डिड्याते डिड्यिरे ।

शी ( आ. प. )–शिश्ये शिश्याते शिश्यिरे ।

क्री ( उ. प. )–चिक्राय चिक्रियतुः चिक्रियुः । चिक्रिये चिक्रियाते चिक्रियिरे ।

चि ( उ. प. )–चिकाय चिक्यतुः चिक्युः । चिक्ये चिक्याते चिक्यिरे ।
चिचाय चिच्यतुः चिच्युः । चिच्ये चिच्याते चिच्यिरे ।

जि ( प. प. )–जिगाय जिग्यतुः जिग्युः । वि + जि ( आ. प. )–विजिग्ये विजिग्याते विजिग्यिरे ।

हि ( प. प. )–जिघाय जिघ्यतुः जिघ्युः ।

अन्त्य इ–ई पूर्वी जर संयुक्त व्यंजन असेल तर इ–ई चा अपित् प्रत्ययांपूर्वी ‘ इय् ’ होतो व इतर वेळीं ‘ य् ’ होतो.

चि यांतील च् चा विकल्पानें क् होतो, जि यांतील ज् चा ग् होतो व हि यांतील ह् चा घ् होतो. हा फरक मूळ धातूंत होतो; अभ्यासांत नव्हे.

श्रु–शुश्रु–शुश्राव शुश्रुवतुः शुश्रुवुः ।

धू–दुधू–दुधाव दुधुवतुः दुधुवुः । दुधुवे दुधुवाते दुधुविरे ।

स्तु–तुस्तु–तुष्टाव तुष्टुवतुः तुष्टुवुः । तुष्टुवे तुष्टुवाते तुष्टुविरे ।

अन्त्य उ–ऊ चा अपित् प्रत्ययांपूर्वी उव् होतो. अपवाद—भू.

भू–बभूव बभूवतुः बभूवुः ।

कृ–चकृ–चकार चक्रतुः चक्रुः । चक्रे चक्राते चक्रिरे ।

स्मृ–सस्मृ–सस्मार सस्मरतुः सस्मरुः । स्तृ, स्वृ, जागृ व ऋ–स्मृ प्रमाणें.

कॄ–चकॄ–चकार चकरतुः चकरुः । चकरे चकराते चकरिरे ।

स्तॄ–तस्तॄ–तस्तार तस्तरतुः तस्तरुः । तस्तरे तस्तराते तस्तरिरे ।

ह्रस्व ऋकारान्त धातूंच्या अन्त्य ऋ चा अपित् प्रत्ययांपूर्वी सामान्यतः र् होतो. परंतु अन्त्य ‘ ऋ ’ पूर्वी संयुक्त व्यंजन असेल तर आणि जागृ आणि ऋ व दीर्घ ‘ ॠ ’ कारान्त धातु यांच्या अन्त्य ऋ–ॠ चा अपित् प्रत्ययांपूर्वीहि गुण होतो. याला पुढील अपवाद समजावे.

शॄ–शशार शशरतुः-शश्रतुः शशरुः-शश्रुः । याचप्रमाणें दॄ, पॄ.

तॄ–ततार तेरतुः तेरुः। जॄ–जजार जजरतुः-जेरतुः जजरुः-जेरुः ।

## नवीन शब्द

**अभि+ज्ञा** (९आ.)–ओळखणें, जाणणें
**अव+सो** ( ४ प. अवस्यति )–संपणे
**त्रिदिवम्** (न.)–स्वर्ग
**नयः** (पुं.)–नीति
**पदवी** (स्त्री.)–स्थिति, अवस्था
**परि+नी** (१ प.)–विवाह करणें
**मिथुनम्** (न.)–जोडी
**म्लै** (१ प. म्लायति)–म्लान होणें, थकणें
**व्या+हृ** (१ प.)–बोलणें
**शॄ** (९ प.)–तुकडे करणें

---

### प्रश्न

१ पुढील वाक्यांत कंसांतील धातूंचीं परोक्षकाळीं रूपें योजाः—

१ रणाङ्गणे चन्द्रकेतुः रथात् ( अव+तॄ ) लवेन सह ( युध् ) च ।
२ द्रोणः पाण्डुपुत्राणाम् एकं हन्तुम् ( निस्+चि ) ।
३ सुग्रीवेण प्रहिताः वानराः राक्षसान् ( परा+जि ) ।
४ जरासन्धः भीमसेनं द्वन्द्वाय ( आ+ह्वे–आ. प. ) ।
५ कपोताः नेतुः उपदेशात् जालेन सह ( उद्+डी ) ।
६ लवकुशयोः गाने प्रावीण्यं दृष्ट्वा सर्वे सभ्याः ( वि+स्मि ) ।
७ इन्द्रस्य सभायां गन्धर्वाः ( गै ) अप्सरसः च ( नृत् ) ।
८ रावणं हत्वा अयोध्यां निवृत्तं सीतायाः सहितं रामं प्रजाः ( स्तु ) ।
९ दिग्विजयाय प्रस्थितः चन्द्रापीडः किन्नरमिथुनम् ( अनु + सृ ) ।
१० महाश्वेता चन्द्रापीडं स्वागतं ( व्या + हृ ) ।

२ पुढील रूपें ओळखा व त्यांचा वाक्यांत उपयोग कराः—

निदधुः । चखान । तत्रे । अधिजगिरे । शुश्रुवतुः । प्रजिघाय । ईयुः निर्ममे । जहौ । दध्मुः ।

३ परोक्ष भूतकाळाचा उपयोग केव्हां करतात हें सोदाहरण दाखवा.

---

# पाठ २

## द्वितीय भूतकाळ—व्यंजनान्त धातूंचीं रूपें



**रुरोह, सिषेच, तत्याज, जगाम** ही रूपें पहिल्या पाठामध्यें आलेली आहेत, व धातूंतील 'अ' शिवाय उपान्त्य ह्रस्व स्वराचा गुण व उपान्त्य 'अ' ची वृद्धि परस्मैपदी तृ. पु. एकवचनी 'अ' या प्रत्ययापूर्वीं करावी लागते असें दाखविलेलें आहे. इतर कांही विशिष्ट व्यंजनान्त धातूंची रूपें करतांना पुढील फरक होतात.

१ १ **रेमे मुहुर्मध्यगता सखीनां सा राजबाला विविधैः प्रकारैः।** (रम्)

२ **रामेण निर्जिता भूपाः शरणं तं प्रपेदिरे।** (प्र + पद्)

३ **अभिमन्युवधं श्रुत्वा कृष्णार्जुनौ विषेदतुः।** (वि + सद्)
**न लेभाते मनःस्वास्थ्यं दुःखसंविग्नमानसौ॥** (लभ्)

४ **न शेकुरन्ये राजानो भङ्क्तुं शिवधनुस्तदा।** (शेकुः–शक्)
**धनुष्मतां वरो रामो बभञ्ज खलु लीलया॥** (भञ्ज्)

५ **दृष्ट्वारिं बभणुर्वीराः सुशीघ्रं हन्यतामिति।** (बभणुः–भण्)

६ **भूपतेर्विजयं ज्ञात्वा ननन्दुः सकलाः प्रजाः।** (नन्द्)

रेमे—रम् – ररम् + ए – रेम् + ए। लेभाते—लभ्–ललभ्+आते–लेभ्+आते। पेदिरे—पद् – पपद् + इरे – पेद्+इरे। सेदतुः—सद् – ससद् + अतुः – सेद् + अतुः। शेकुः—शक् – शशक् + उः – शेक् + उः। परंतु

ननन्दुः—नन्द् – ननन्द् + उः। बभणुः—भण् – बभण् + उः।

वरील रूपें 'अपित्' प्रत्यययुक्त आहेत व त्यांतील पहिलीं पांच तयार होतांना अभ्यासित अवयवांचा लोप होऊन मूळ धातूंतील 'अ' चा 'ए' असा

फरक झाला आहे. कारण त्या धातूंत दोन एकेरी व्यंजनांमध्यें 'अ' आहे व मूळ व्यंजनाचा अभ्यासामध्यें बदल होत नाहीं. परंतु शेवटच्या दोन रूपांमध्यें वरील फरक झाला नाहीं कारण 'नन्द्' यांतील 'अ' नंतर संयुक्त व्यंजन आहे व 'भण्' यांतील 'भ्' अभ्यासांत बदलतो.

अपवाद —वरील नियमाला वम्, शस् व दद् हे अपवाद आहेत. त्याप्रमाणें पुढील धातु वरील नियमात येणारे नसले तरी वरील फरक त्यांमध्यें होतो.

(अ) फल्, भज्, त्रप्, राध्, तॄ यामध्यें वरील फरक नित्य होतो.

(आ) भ्रम्, त्रस्, फण्, राज्, भ्राज्, भ्राश्, म्लाश्, स्यम्, स्वन्, जॄ यांमध्यें वरील फरक विकल्पानें होतो.

१ त एव विविदुर्मोक्षं य ईजुः परमेश्वरम् । (यज्)

श्रावणस्य पितरौ सुदुःखितौ, दशरथं ननु शापमूचतुः । (वच्)

जृम्भकास्त्राहता वीरा सुषुपुर्मोहिता इव । (स्वप्)

मुनेर्जगृहतुः पादौ राजा राज्ञी च सादरम् । (ग्रह्)

वरील वाक्यांतील परोक्ष भूतकाळी रूपांचें पृथक्करण पुढीलप्रमाणें होईल.

ईजुः—यज् – ययज् – इइज् – ईज् + उः ।

ऊचतुः—वच् – ववच् – उउच् – ऊच् + अतुः ।

सुषुपुः—स्वप् – स्वस्वप् – सुसुप् – सुषुप् + उः ।

जगृहतुः—ग्रह् – जग्रह् – जगृह् + अतुः ।

धातूमधील य्, व्, आणि र् यांबद्दल अपित् प्रत्यय जोडण्यापूर्वी अभ्यासित भागामध्यें आणि मूळधातूमध्यें, शक्य तेथें, इ, उ, आणि ऋ असा बदल होतो. यालाच संप्रसारण असें म्हणतात.

उवाह भारं राज्यस्य पित्रादिष्टः सुतः पुनः । (वह्)

बाणैर्विव्याध निशितैर्लक्ष्मणः खलु ताडकाम् ॥ (व्यध्)

उवाह—वह् – ववह् – उवह् – उवाह् + अ ।

विव्याध—व्यध् – व्यव्यध् – विव्यध् + अ ।

परोक्षभूतकाळाच्या अ या पित् प्रत्ययापूर्वी अभ्यासित भागामध्येंच फक्त संप्रसारण होतें, मूळ धातूमध्यें होत नाहीं हें वरील पृथक्करणावरून दिसून येईल.

टीपः—संयुक्त व्यंजनांतील दोन्ही व्यंजनें संप्रसारण घेणारी असल्यास दुसऱ्यास संप्रसारण होतें.

## संप्रसारण घेणाऱ्या धातूंचीं रूपें

**यज्** १ प.–इयाज ईजतुः ईजुः
आ.–ईजे ईजाते ईजिरे

**वस्** १ प.–उवास ऊषतुः ऊषुः

**वच्** २ प.–उवाच ऊचतुः ऊचुः

**ब्रू** बद्दल आ.–ऊचे ऊचाते ऊचिरे

वश् २ प.–उवाश ऊशतुः ऊशुः

**व्यध्** ४ प.–विव्याध विविधतुः विविधुः

**ग्रह्** ९ प.–जग्राह जगृहतुः जगृहुः
आ.–जगृहे जगृहाते जगृहिरे

ज्या २ प.–जिज्यौ जिज्यतुः जिज्युः

व्ये १ प.–विव्याय विव्यतुः विव्युः
आ.–विव्ये विव्याते विव्यिरे

**श्वि** १ प.–शुशाव शुशुवतुः शुशुवुः
शिश्वाय शिश्वियतुः शिश्वियुः

**वह्** १ प.–उवाह ऊहतुः ऊहुः
आ.–ऊहे ऊहाते ऊहिरे

**वद्** १ प.–उवाद ऊदतुः ऊदुः

**वप्** १ प.–उवाप ऊपतुः ऊपुः
आ.–ऊपे ऊपाते ऊपिरे

**स्वप्** २ प.–सुष्वाप सुषुपतुः सुषुपुः

व्यच् ६ प.–विव्याच विविचतुः विविचुः

**ह्वे** १ प.+जुहाव जुहुवतुः जुहुवुः

**आ + ह्वे**–आ. आ.–जुहुवे जुहुवाते जुहुविरे

वे १ प.–उवाय ऊयतुः-ऊवतुः-ऊयुः-ऊवुः
ववौ ववतुः ववुः
आ.–ऊये-वव्रे ऊयाते-ऊवाते ऊयिरे-ऊविरे
वव्रे ववाते वविरे

३ १ **सावित्र्यां <u>जज्ञिरे</u> पुत्रा यमराजप्रसादतः।** ( जन् )

२ **<u>अनुजग्मुः</u> प्रजा रामं काननं प्रति प्रस्थितम्।** ( गम् )

३ **<u>जघ्नतुः</u> प्रबलौ वीरौ सैनिकान् पुरतः स्थितान्।** ( हन् )

४ **चख्नुः सगरजाः पुत्राः पृथ्वीं मार्गयितुं हयम्।** ( खन् )

वरील वाक्यांतील क्रियापदांचीं रूपें **अपित्**–प्रत्यययुक्त आहेत.

जज्ञिरे—जन्–जजन्–जज्न्–जज्ञ्–जज्ञ्+इरे।

जग्मुः–गम्–जगम्–जग्म्+उः। जघ्नतुः—हन्–जहन्–जह्न्–जघ्न्+अतुः।

चख्नुः–खन्–चखन्–चख्न्+उः।

गम्, जन्, हन्, खन् व (घस्) यांतील उपान्त्य 'अ'चा अपित् प्रत्ययांपूर्वी लोप होतो, व 'अ' चा लोप झाल्यावर 'हन्' यातील 'ह्'चा 'घ्' होतो.

४ व्यानशे सकलां पृथ्वीं रघोः कीर्तिर्दिवं तथा ( वि+आनशे-अश् ५ आ. )

नानर्ह वितथं वक्तुं सत्यवादी युधिष्ठिरः । (आनर्ह-अर्ह् )

आनर्दू राक्षसाः पृथ्वीं सुघोरैरात्मकर्मभिः ( आनर्दुः-अर्द् )

रामो विषादमानर्च्छ विप्रयोगेण सीतया । ( आनर्च्छ-ऋच्छ् )

व्यानञ्ज भक्तवात्सल्यं ज्ञात्वा तान्सङ्कटात्प्रभुः । ( वि+आनञ्ज-अञ्ज् )

आनशे—अश् – अ अश् – अ न् अश् – आनश् + ए ।

आनर्ह—अर्ह् – अ अर्ह् – अ न् अर्ह् – आनर्ह् + अ ।

आनर्च्छ—ऋच्छ् – अ ऋच्छ् – अ न् ऋच्छ् + अ – आ न् अर्च्छ् + अ ।

आनर्द—अर्द् – अ अर्द् – अ न् अर्द् – आनर्द् + अ ।

आनञ्ज—अञ्ज् – अ अञ्ज् – अ न् अञ्ज् – आनञ्ज् – अ ।

वरील वाक्यांतील अर्ह्, अर्द्, अञ्ज् या धातूंच्या आरंभी 'अ' आहे व त्याचे पुढें संयुक्त व्यंजन आहे. अशा तऱ्हेचे धातु व अश् (५ आ.) व ऋच्छ् यांचा अभ्यासित स्वर व मूळ स्वर यांमध्यें 'न्' येतो व अभ्यासित 'अ' चा 'आ' होतो.

## नियम ३ व ४ यांतील धातूंचीं कांहीं ज्यास्त रूपें

**सम् + गम्** ( आ. )—सञ्जग्मे सञ्जग्माते सञ्जग्मिरे ।

**आ + हन्** ( आ. )—आजघ्ने आजघ्नाते आजघ्निरे ।

**घस्** ( अद् बद्दल )—जघास जक्षतुः जक्षुः ।

**ऋच्छ्** ( १ प. )—आनर्च्छ आनर्च्छतुः आनर्च्छुः ।

## परोक्षभूतकाळीं कांहीं अनियमित रूपें

रध्—ररन्ध ररन्धतुः ररन्धुः ।

**मृज्** ( २ प. )—ममार्ज ममार्जतुः—ममृजतुः ममार्जुः—ममृजुः

**इष्**—४ प. ६ प.—इयेष ईषतुः ईषुः ।

**अश्** ( ९ प. )—आश आशतुः आशुः ।

**अद्** ( २ प. )—आद आदतुः आदुः ।
जघास जक्षतुः जक्षुः ।

उख् १ प.—उवोख ऊखतुः ऊखुः ।

टीपः—या व इतर पाठांत बारीक अक्षरांत लिहिलेली रूपें फारशी महत्त्वाची नाहीत.

## नवीन शब्द

अर्द् ( १ प. )–त्रास देणें
अर्ह् ( १ प. )–योग्य असणे, पूजणें
उद्+पत् ( १ प. )–उडणें
उख् ( १ प. )–जाणें
ऋच्छ् ( ६ प. )–,,
जृम्भकास्त्रम्–एका अस्त्राचें नांव
ज्या ( ९ प. )–वृद्ध होणें
त्रप् ( १ आ. )–लाजणें
त्रस् ( १, ४ प. )–भिणें
निशित ( वि. )–तीक्ष्ण
प्र+पद् ( ४ आ. )–शरण जाणें
फण् ( १ प. )–जाणें
भण् ( १ प. )–बोलणें
भीम ( वि. )–भयंकर
महार्ह ( वि. )–मोठ्या किंमतीचें
मार्ग् ( १० उ. )–शोधणें
मेदिनी ( स्त्री. )–पृथ्वी
वप् ( १ उ. )–पेरणें
वश् ( २ प. )–इच्छा करणें
वि+अञ्ज् ( ७ प. )–उघड करणें
वि+अश् ( ५ आ. )–व्यापणें
वि+सद् ( १ प. )–दुःखी होणें
वे ( १ उ. )–विणणें
व्यच् ( ६ प. )–फसवणें
व्ये ( १ उ )–झाकणें
रध् ( ४ प. )–ठार मारणें
स्खल् ( १ प. )–चुकणें
स्यम् ( १ प. )–जाणें
हरिः ( पु. )–वानर

---

### प्रश्न

१ पुढील वाक्यांत कंसांतील धातूंचीं द्वि. भूतकाळी योग्य रूपें लिहाः—

१ रत्नैर्महार्हैः ( तुष् ) न देवाः न ( भज्–आ. ) भीमविषेण भीतिम् ।
२ अभिमन्युवधेन पाण्डवाः ( वि+सद् ) ।
३ सीतालक्ष्मणौ रामं वनम् ( अनु+गम् ) ।
४ क्रुद्धाः अपि देवाः नलं दमयन्ती च ( अनु+ग्रह् ) ।
५ शङ्करस्य तृतीयनेत्रात् अग्निः ( जन् ) मदनं च ( दह् ) ।
६ भीष्मादयः कौरवाः द्रौपद्याः वस्त्रकर्षणं वीक्षितुं न ( अर्ह् ) ।
७ रावणस्य वधेन अन्तःपुरवासिन्यः स्त्रियः ( वि+लप् ) ।

८ द्विजाः च ( नद् ) घोराः च ( सम्+चल् ) च मेदिनी ।
( तृप् ) रुधिरं देवः ( स्खल् ) च तुरङ्गमाः ॥
९ हनुमान् गिरेः शिखरम् उत्पाट्य तद् गृहीत्वा ( उद्+पत् ) ।
१० सर्वे राक्षसाः विभीषणः हरयः च प्राञ्जलयः रामम् ( वच् ) ।

२ पुढील रूपें ओळखून वाक्यांत योजा—निनेदुः । रेजतुः । इयाज । विविधुः । सुष्वाप । ववृधिरे । दद्दशुः । नेशतुः । प्रोषुः । आदुः ।

३ पुढील धातूंचीं तृ. पुरुषी रूपें लिहा:—मन्, आ+रम्, नि+सद्, सञ्ज्, क्रुध्, आप्, तप्, तृप्, प्र+नम्, दुह्.

---

# पाठ ३

## द्वितीय भूतकाळ ( आम्–प्रत्यययुक्त )



### १

१ ईक्षांचक्रे मुदा रामो लवस्य सुपराक्रमम् । ( ईक्ष् १ आ. )
२ द्रौपदी सङ्कटग्रस्ता चिन्तयामास माधवम् । ( चिन्त् १० उ. )
३ हैमं मृगं चारुतमं विलोक्य सीता तदर्थं स्पृहयांबभूव ।
( स्पृह् १० उ. ) ।
४ सुराः प्रसादयामासुर्ब्रह्माणं हेतुसिद्धये । ( प्र + सद् – प्र. )
५ तौ दम्पती स्वां प्रति राजधानीं प्रस्थापयामास वशी वसिष्ठः । ( प्र + स्था – प्र. )

वरील वाक्यांतील क्रियापदें द्वितीय भूतकालार्थी आहेत, परंतु त्यांचीं रूपें अभ्यासयुक्त रूपांप्रमाणें दिसत नाहींत.

ईक्ष् – ईक्ष् + आम् + चक्रे । चिन्त् – चिन्तय + आम् + आस ।
स्पृह् – स्पृहय + आम् + बभूव । प्र + सद् – प्रसादय + आम् + आसुः ।
प्र + स्था – प्रस्थापय + आम् + आसुः ।

(१) वरील रूपें दीर्घस्वरारंभी, दशम गण व प्रयोजक अशा धातूंचीं आहेत. (२) विकरणसहित अंगाला ' आम् ' जोडलेला आहे. (३) व नंतर जरूर तीं कृ, भू व अस् या धातूंचीं परोक्षभूताचीं रूपें जोडलेली आहेत.

## ' आम् ' प्रत्यययुक्त रूपें होणारे धातु

**नित्य**– १ पहिल्या नऊ गणांच्या ज्या धातूंच्या आरंभी ' अ–आ ' शिवाय दीर्घ स्वर आहे अथवा ह्रस्व स्वर असून त्यापुढें संयुक्त व्यंजन आहे असे धातु. जसें—ईश्, ईक्ष्, ईड्, ईह्, ऊह्, उन्द्, इन्ध्, एध्, अपवाद–ऋच्छ्.

२ दशम गणाचे धातु व प्रयोजक रूपें व इतर साधित धातु व १ ते ९ गणाचे अनेकावयवी धातु. जसें—कथय, कारय, जिगमिष, आविलय, चकास्, अपवाद–ऊर्णु.

३ दय्, अय्, आस्, कास्.

**वैकल्पिक**—१ उष्, विद्, दरिद्रा, जागृ. २भी ह्री, भृ, हु. ३ गुप्, पण्, कम्, धूप्, पन्, विच्छ्, ऋत्. याचीं रूपें पुस्तक २, परिशिष्ट २ मध्यें पहा.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| **ईक्ष्**–१ | आ.— | ईक्षांचक्रे | ईक्षांचक्राते | ईक्षांचक्रिरे |
| | | ईक्षामास | ईक्षामासतुः | ईक्षामासुः |
| | | ईक्षांबभूव | ईक्षांबभूवतुः | ईक्षांबभूवुः |
| **कथ्**–१० | प.— | कथयांचकार | कथयांचक्रतुः | कथयांचक्रुः |
| | | कथयामास | कथयामासतुः | कथयामासुः |
| | | कथयांबभूव | कथयांबभूवतुः | कथयांबभूवुः |
| १० | आ.— | कथयांचक्रे | कथयांचक्राते | कथयांचक्रिरे |
| | | कथयामास...इ., | | कथयांबभूव...इ. |

या रूपांवरून असें दिसून येईल कीं सविकरण धातूला ' आम् ' जोडून नंतर धातु प. पदी असल्यास ' कृ, भू व अस् ' यांचीं परस्मैपदी द्वि. भूतकाळी रूपें जोडावीं व धातु आत्मनेपदी असल्यास ' कृ ' ची आ. पदी व ' भू आणि अस् ' यांची परस्मैपदी द्वि. भूत. रूपें जोडावी.

## ' आम् ' प्रत्यययुक्त द्वि. भूतकाळीं कांहीं धातूंचीं रूपें

**दय्** १ आ.—दयांचक्रे...., दयामास...,दयांबभूव...

अय् १ आ., आस् २ आ., कास् १ आ. 'दय्' प्रमाणें चालवावे.

* उष् १ प.—ओषांचकार-उवोष..., ओषामास..., ओषांबभूव...

**विद्**—२ प.-विदांचकार-विवेद..., विदामास...विदांबभूव...

**दरिद्रा** २ प.—दरिद्रांचकार-ददरिद्रौ...,दरिद्रामास..., दरिद्रांबभूव...

***जागृ** २ प.—जागरांचकार-जजागार.. , जागरामास..., जागरांबभूव...

† **भी** ३ प.—बिभयांचकार-बिभाय..., बिभयामास..., बिभयांबभूव

† **ह्री** ३ प. जिह्रयांचकार-जिह्राय..., जिह्रयामास..., जिह्रयांबभूव...

† **हु** ३ प.—जुहवांचकार-जुहाव...,जुहवामास..., जुहवांबभूव...

† **भृ** ३ उ.—बिभरांचकार-चक्रे-बभार-बभ्रे, बिभरामास..., बिभरांबभूव...

***गुप्** १ प.—गोपायांचकार-जुगोप..., गोपायामास..., गोपायांबभूव...

**कम्** १ आ.—कामयांचक्रे-चकमे..., कामयामास.... कामयांबभूव...

***टीप**—'आम्' पूर्वी उपान्त्य ह्रस्व व अन्त्य स्वराला गुण झाला आहे व † मध्यें अभ्यास होऊन शिवाय अन्त्य स्वराला गुण झाला आहे.

## २ परोक्ष भूतकाळाचा उपयोग

परोक्ष भूतकाळाचा उपयोग फार प्राचीन काळची—वर्णन करणारानें न पाहिलेली—क्रिया दर्शविण्याकरितां करतात हें पहिल्या पाठामध्यें दर्शविलेलें आहे.

### विशिष्ट उपयोग

अपि त्वं मित्राय वार्तां कथयांचकर्थ । नाहं तं ददर्श ।

विसंज्ञोऽहं बहु विललापेति मम भ्राता वदति ।

मदिरोन्मत्तोऽहमात्मानमेव निनिन्देति परिजनः कथयति ।

अशीं वाक्यें बरोबर आहेत, कारण बोलणारा क्रिया केल्याचें नाकारीत आहे अथवा तो क्रिया करतांना शुद्धीवर नाहीं. अशा वेळीं द्वि. भूतकाळी रूपें प्रथम पुरुषामध्यें योजतां येतात. परंतु

'अहं गृहं जगाम पाठांश्च पपाठ' असें म्हणतां येत नाहीं, कारण बोलणारा कांहींहि नाकारीत नाहीं आणि तो शुद्धीवर आहे.

टीप.—सामान्य माहिनीकरितां परोक्ष भूतकाळाचे सर्व प्रत्यय व 'कृ' धातूचीं रूपें पुढें दिलीं आहेत.

प. पदीः—अ व म, थ अथुः अ, अ अतु उः

आ. पदी.—ए वहे महे, से आथे ध्वे, ए आते इरे

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| कृ.—प. पदी—चकार-कर | चकृव | चकृम | आ. पदी—चक्रे | चकृवहे | चकृमहे |
| चकर्थ | चक्रथुः | चक्र | चकृषे | चक्राथे | चकृढ्वे |
| चकार | चक्रतुः | चक्रु | चक्रे | चक्राते | चक्रिरे |

## ३ परोक्ष भूतकाळ—कर्मणि प्रयोग

१ यतिपार्थिवलिङ्गधारिणौ ददृशाते रघुराघवौ जनैः।

२ दुकूलवासाः स (अजः) वधूसमीपं निन्ये विनीतै-
रवरोधरक्षैः।

३ श्रीविष्णुः पूजयामासे सुरैरिन्द्रपुरोगमैः।

४ सैन्यं प्रस्थापयांचक्रे भूपेन विजयार्थिना।

वरील वाक्यांतील क्रियापदें परोक्षभूतकाळी कर्मणि आहेत हें अर्थावरून ध्यानांत येईल.

ददृशाते—दृश् – ददृश् + आते। निन्ये — नी – निनी + ए।

पूजयामासे—पूज् – पूजय + आम् + आसे। प्रस्थापयांचक्रे—प्र + स्थापय + आम् + चक्रे।

यावरून असें दिसून येईल कीं अभ्यासयुक्त परोक्षभूतकाळी कर्मणि रूपें आत्मनेपदी प्रत्यय जोडले म्हणजे तयार होतात, व 'आम्' प्रत्यययुक्त परोक्षभूतकाळी कर्मणि रूपें 'कृ, भू व अस्' यांचीं आत्मनेपदी परोक्षभूतकाळी रूपें जोडलीं म्हणजे तयार होतात.

## ४ द्वि. भूतकाळी धातुसाधित विशेषणें

नगरोपकण्ठे स्वाश्रमे तस्थिवांसं रघुमजः प्रार्थयांचक्रे।

सम्पदमधिजग्मुषो नरान् सर्वे गुणा आश्रयन्ते ।

सिंहासने निषेदुषी राज्ञी दासीभिः परिषेव्यते ।

वरील वाक्यांतील अधोरेखित रूपें परोक्षभूतकाळार्थी धातुसाधित विशेषणें आहेत. त्यांतील मूळ शब्द **तस्थिवस्**, **जग्मिवस्** व **निषेदिवस्** असे आहेत. हे शब्द पुस्तक २ पाठ ६ मधील 'विद्वस्' प्रमाणें तिन्ही लिंगांत चालतात.

स्था—तस्थुः – तस्थ् + इ + वस् । गम्—जग्मुः – जग्म् + इ + वस्
नि + सद—निषेदुः –निषेद् + इ + वस् ।

परोक्षभूतकाळी प. पदी तृ. पुरुषी बहुवचनी रूप घेऊन त्यांतील प्रत्यय काढू उरलेला भाग एकावयवी असल्यास परस्मैपदी धातूंना 'इ' सहित **वस्** लावतात

विभिदान—विभिदिरे – विभिद् + आन । चक्राण—चक्रिरे – चक्र् + आन ।

धातु आत्मनेपदी असल्यास परोक्षभूतकाळी तृ. पुरुषी बहुवचनी रूप घेऊन त्यांतील प्रत्यय काढून 'आन' हा प्रत्यय जोडला असतां परोक्षभूतकाळी धातुसाधित विशेषणें तयार होतात; व ही अकारान्त विशेषणांप्रमाणें पुंलिंगामध्यें 'देव' प्रमाणें, नपुंसकलिंगामध्यें 'वन' प्रमाणें व 'आ' जोडून स्त्रीलिंगामध्यें 'माला' प्रमाणें चालवावीं.

## कांहीं रूपें

कृ—चकृवस् – चक्राण । स्तु—तुष्टुवस् –तुष्टुवान ।

नी—निनीवस् – निन्यान । दा—ददिवस् – ददान ।

इ – ईयिवस् । वस् – ऊषिवस् । तन—तेनिवस् – तेनान ।

सद—सेदिवस् । श्रु—शुश्रुवस् । यज्—ईजिवस् – ईजान ।

बन्ध्—बबध्वस् । भञ्ज्—बभञ्ज्वस् । पॄ—पुपूर्वस् । तॄ—तितीर्वस् ।

गम्—जग्मिवस् – जगन्वस् । हन्—जघ्निवस् – जघन्वस् । दृश्—ददृशिवस्–ददृश्वस् ।

## नवीन शब्द

ईड् ( २ आ. )—स्तुति करणें
इह् ( १ आ. )—इच्छा करणें
उन्द् ( ७ प. )—भिजवणें
उष् ( १ प. )—जळणें
ऊह् ( १ आ. )—तर्क करणें
एध् ( १ आ. )—वाढणें
कास् ( १ आ. )—खोकणें
हैम ( वि. )—सोन्याचा

---

### प्रश्न

१ पुढील वाक्यांत कंसांतील धातूंची परोक्ष भूतकाळाचीं योग्य रूपें योजाः—

१ शङ्करः किरातरूपेण अर्जुनस्य भक्ति पराक्रमं च ( परि + ईक्ष् )।
२ वसिष्ठः राजसेवकैः भरतं मातुलगृहात् ( आ + नी – प्र. )।
३ शत्रुणा पराजिताः सैनिकाः रणाङ्गणात् ( परा + अय् )।
४ महतीं कौरवसेनां दृष्ट्वा अपि अभिमन्युः न ( भी )।
५ मारुतिः सीतां रामकुशलकथनेन ( सान्त्व् )।
६ रावणः अशोकवनिकायां स्थापितां सीताम् ( तर्ज् )।
७ पुरा ज्ञानार्थिनः छात्राः गुरून् ( उप + आस् )।
८ कुन्तीपुत्रः धनञ्जयः सङ्ग्रामे अयुध्यमानं केशवम् ( वृ १० आ. )।
९ दशरथः रामलक्ष्मणौ विश्वामित्रेण सह ( प्र + स्था–प्र. )।
१० अर्जुनः जयद्रथवधप्रतिज्ञाम् ( उद् + घुष् )।

२ ( अ ) वरील १, २, ५, ७, ९ व १० वाक्यें प्रयोग बदलून लिहा.
( आ ) पुढील वाक्यांचा प्रयोग बदलाः—

ध्रुवः विष्णुं तुष्टाव । चोराः सैनिकैः जगृहिरे। भक्ताः ईशस्य स्तोत्राणि जगुः। छात्राः अध्ययनम् आरेभिरे। भृत्याः भारम् ऊहुः।

३ पुढील वाक्यांत कंसांतील धातूंचीं परोक्ष भू. धा. विशेषणें योजाः—

सम्पदम् ( अधि + गम् ) नरस्य सुखं वर्धते।
कर्तव्यम् ( अनु + स्था ) नराः स्वास्थ्यं लभन्ते।
शास्त्राणां पारं ( दृश् ) पण्डितेन लोकहितं कर्तव्यम्।
रावणं ( हन् ) रामं प्रजा अभ्यनन्दन्।

---

# पाठ ४

## भविष्यकाळ ( द्वितीय )



१ १ हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम् ।

२ मोदिष्यते नरः प्रायो यशो लब्ध्वानपेक्षितम् ।

३ यथा दीपशिखाकान्त्या तमो नूनं नशिष्यति ।

तथा नृमनसो मोहो नङ्क्ष्यति ज्ञानतेजसा ॥

४ वदिष्यसि यदासत्यं पापभाक् त्वं भविष्यसि ।

वरील वाक्यांतील अधोरेखित शब्द भविष्यकालार्थी रूपें आहेत हें अर्थावरून ध्यानांत येईल.

( अ ) प्राप्स्यसि—(प्र) आप्+स्यसि । भोक्ष्यसे—भुज्–भोज्–भोक् + स्यसे ।

( आ ) मोदिष्यते—मुद्–मोद् + इ+स्यते । वदिष्यसि—वद् + इ + स्यसि ।
भविष्यसि—भू–भो–भव् + इ + स्यसि ।

( इ ) नङ्क्ष्यति—नश्–नंश्–नङ्क्+स्यति । नशिष्यति—नश् + इ + स्यति ।

'अ' मधील रूपांत धातूंना प्रत्यय एकदम जोडलेले आहेत, 'आ' मधील रूपांत 'इ' सहित जोडलेले आहेत व 'इ' मध्यें धातूला प्रत्ययांपूर्वी 'इ' विकल्पानें जोडलेली आहे. म्हणून 'अ' मधील धातूंना **अनिट्** ( अन् + इट् ), 'आ' मधील धातूंना **सेट्** ( स + इट् ) व 'इ' मधील धातूंना **वेट्** ( वा+इट् ) असें म्हणतात.

**टीपः**—१ वर्तमान. प्र. भूत, आज्ञार्थ व विध्यर्थ यांना सार्वधातुक अर्थ व काळ म्हणतात, व द्वितीय भूत, प्रथम भविष्य, द्वितीय भविष्य, तृतीय भूत. संकेतार्थ व आशीर्वादार्थ यांना आर्धधातुक काळ व अर्थ म्हणतात.

२ आर्धधातुक काळ व अर्थ यांच्याकरिता सर्व धातूंचे तीन विभाग वर दर्शविल्याप्रमाणें ( सेट्, वेट् व अनिट् ) असे करावे लागतात. याबद्दल माहिती प्रास्ताविक विभागांत दिली आहे.

१ भविष्यकाळाचे संस्कृतमध्यें दोन प्रकार आहेत. वरील रूपें द्वितीय किंवा सामान्य भविष्यकाळाची आहेत व हाच प्रकार जास्त उपयोगांत येतो.

| प. प. | दा | | आ. प. | | |
|---|---|---|---|---|---|
| दास्यामि | दास्यावः | दास्यामः | दास्ये | दास्यावहे | दास्यामहे |
| दास्यसि | दास्यथः | दास्यथ | दास्यसे | दास्येथे | दास्यध्वे |
| दास्यति | दास्यतः | दास्यन्ति | दास्यते | दास्येते | दास्यन्ते |

| भू (प. प.) | | | मुद् (आ. प.) | | |
|---|---|---|---|---|---|
| भविष्यामि | भविष्यावः | भविष्यामः | मोदिष्ये | मोदिष्यावहे | मोदिष्यामहे |
| भविष्यसि | भविष्यथः | भविष्यथ | मोदिष्यसे | मोदिष्येथे | मोदिष्यध्वे |
| भविष्यति | भविष्यतः | भविष्यन्ति | मोदिष्यते | मोदिष्येते | मोदिष्यन्ते |

वरील रूपांवरून पुढील गोष्टी दिसून येतातः—

(१.) द्वितीय भविष्यकाळाचे प्रत्यय वर्तमानकाळी प्रत्ययांना स्य जोडून तयार केलेले आहेत. (२) सर्व प्रत्ययांपूर्वी उपान्त्य ह्रस्व व अन्त्य स्वराला गुण झालेला आहे. म्हणजे सर्व प्रत्यय पित् आहेत. (३) 'स्य' युक्त प्रत्ययांतील आद्य 'स्' चा जरूर तेथें 'ष्' केलेला आहे. (४) प्रत्ययांपूर्वी 'इ' जोडणें, विकल्पानें जोडणें व मुळींच न जोडणें हें धातु सेट्, वेट् किंवा अनिट् असेल त्यावर अवलंबून असतें.

## प्रत्यय

प. पदीः—स्यामि स्यावः स्यामः। स्यसि स्यथः स्यथ। स्यति स्यतः स्यन्ति।

आ. पदीः—स्ये स्यावहे स्यामहे। स्यसे स्येथे स्यध्वे। स्यते स्येते स्यन्ते।

२ यथेच्छति भवान् सत्यं करिष्येऽहं तथा खलु।
रामो दाशरथिः शूरो दशवक्त्रं हनिष्यति।
सीतापहरणं ज्ञात्वा रामः शोकं गमिष्यति।
तदाहमागमिष्यामि यदा त्वं मां स्मरिष्यसि।

वरील क्रियापदांतील धातु अनिट् आहेत परंतु त्यांना द्वि. भविष्य काळामध्यें प्रत्ययांपूर्वी 'इ' जोडावी लागते. ह्रस्व ऋकारान्त, गम् (प. पदी) व हन् यांना 'इ' जोडावी लागते.

टीप :—मृ-मरिष्यति. आर्धधातुक काळांमध्यें 'मृ' परस्मैपदी होतो.

३ साधुः प्राणिनामुपकारायात्मनो प्राणानप्युत्स्रक्ष्यति ।

सदाचारवान्नरो जगति स्वकल्याणं द्रक्ष्यति ।

मनःपूतं कर्म कुर्वन्तं नरं दोषो न कदापि स्प्रक्ष्यति–स्पर्क्ष्यति ।

सृज् व दृश् या अनिट् धातूंना प्रत्यय लावतांना गुण होत नाहीं, तर उपान्त्य ह्रस्व 'ऋ' चा 'र' होतो. इतर उपान्त्य ह्रस्व 'ऋ' असणाऱ्या अनिट् धातूंच्या 'ऋ' चा गुण होतो अथवा 'र' होतो. जसें—स्पृश्–स्पर्क्ष्यति–स्प्रक्ष्यति ।

४ वातेनाहता नौर्जले निमङ्क्ष्यति नङ्क्ष्यति च ।

महता वेगेनाकृष्टा रज्जुस्त्रुटिष्यति ।

शङ्खनिनादं श्रुत्वा वीराणां बाहवः स्फुरिष्यन्ति ।

भक्ता देवं निष्काममनसा नुविष्यन्ति ।

मस्ज् या अनिट् धातूच्या व नश् या वेट् धातूच्या 'इ' न लावतां होणाऱ्या रूपांमध्यें अन्त्य व्यंजनापूर्वी अनुनासिक येतें. त्याचप्रमाणें त्रुट्, स्फुर्, स्फुट्, कुट्, या षष्ठ गणाच्या धातूंच्या उपान्त्य ह्रस्व 'उ' चा गुण होत नाहीं व नू आणि धू या षष्ठ गणांच्या धातूंच्या अन्त्य स्वराचा गुण न होतां 'उव्' होतो.

५ सूर्योदयात्प्रागरुणो दिशां मालिन्यं मार्जिष्यति मार्क्ष्यति ।

नृपः प्रजा नयेन गोपायिष्यति-गोप्स्यति-गोपिष्यति ।

अविचारो नाशाय कल्पिष्यते-कल्प्स्यते-कल्प्स्यति ।

छात्रा गुरोराज्ञामनुवर्तिष्यन्ते-अनुवर्त्स्यन्ति ।

मृज्, गुप्, कृप्, हे वेट् आहेत व वृत् हा सेट् आहे. मृज् च्या उपान्त्य 'ऋ'ची वृद्धि होते; गुप् यांतील उपान्त्य 'उ' चा गुण होऊन दोन, शिवाय 'आय' जोडून आणखी एक अशीं एकंदर तीन रूपें होतात. कृप् व स्यन्द् ह्या वेट् धातूंना ज्या वेळीं 'इ' लागत नाहीं त्या वेळी ते धातु विकल्पानें परस्मैपदी होतात व त्याचप्रमाणें वृत्, वृध् हे सेट् धातु विकल्पानें परस्मैपदी होतात, व त्या वेळीं त्यांना 'इ' लागत नाहीं.

कृत् व नृत् हे सेट् असूनहि त्यांना विकल्पानें 'इ' जोडून रूपें केली जातात. जसें—नर्त्स्यति–नर्तिष्यति ।

## कांहीं धातूंचीं रूपें

अनिट्—*गै–गा–गास्यति, इ–एष्यति, अधि+इ (आ.)–अध्येष्यते, प्रच्छ्–प्रक्ष्यति, लभ्–लप्स्यते, बुध् (४ आ.)–भोत्स्यते, बन्ध्–भन्त्स्यति, दह्–धक्ष्यति, दुह्–धोक्ष्यति-ते, वच्–वह्–वक्ष्यति-ते, शक्–शक्ष्यति, भञ्ज्–भङ्क्ष्यति, आप्–आप्स्यति, युध्–योत्स्यते, मन्–मंस्यते, †वस्–वत्स्यति, रम्–रंस्यते, ध्यै–ध्यास्यति, नी–नेष्यति, श्रु–श्रोष्यति, दंश्–दङ्क्ष्यति, नम्–नंस्यति, भज्–भक्ष्यति–ते, यज्–यक्ष्यति–ते, त्यज्–त्यक्ष्यति, रभ्–रप्स्यते, रुह्–रोक्ष्यति.

वेट्—स्वृ–स्वरिष्यति, सू–सोष्यते-सविष्यते, धू–धोष्यति-ते, धविष्यति-ते, स्यन्द्–स्यन्दिष्यते-स्यन्त्स्यते-स्यन्त्स्यति, तृप्–तर्पिष्यति-तर्प्स्यति-त्रप्स्यति, गाह्–घाक्ष्यते-गाहिष्यते, गुह्–गूहिष्यति-ते, घोक्ष्यति-ते, द्रुह्–द्रोहिष्यति-ध्रोक्ष्यति, मुह्–मोहिष्यति-मोक्ष्यति.

सेट्—भू–भविष्यति, शी–शयिष्यते, श्रि–श्रयिष्यति-ते, कथ्–कथयिष्यति-ते, वृध्–वर्धिष्यते-वर्त्स्यति; रक्ष्–रक्षिष्यति, बुध्–(१ प.)–बोधिष्यति, वस् (२ आ.)–वसिष्यते. ‡तॄ–तरिष्यति-तरीष्यति, ‡ग्रह्–ग्रहीष्यति-ते, जन्–जनिष्यते.

टीप—धातुंना ज्यावेळी प्रत्ययांपूर्वी 'इ' जोडली जात नाहीं त्या वेळी रूपसिद्धीच्या नियमानुसार संधि करून रूपें केली जातात.

## द्वि. भविष्यकाली धातुसाधित विशेषणें

६ प्रहरिष्यतो विधेः सर्वाणि वस्तूनि शस्त्राणि भवन्ति ।

ग्रामं गमिष्यन् पान्थो बहून्युपकरणानि जग्राह ।

योत्स्यमानौ वीरौ सेनापतेरादेशेनैव युद्धमकुरुताम् ।

---

* ए, ऐ व ओ हे अन्त्य स्वर असणारे धातु आकारान्त समजून त्याची रूपें करावीं.

† वस्–१ प.–या धातुच्या 'स्' चा 'स्' नें आरंभ होणाऱ्या प्रत्ययापूर्वी 'त्' होतो.

‡ दीर्घ ऋ कारान्त धातु व वृ या सेट् धातुंना लागणारी 'इ' विकल्पानें दीर्घ होते. 'ग्रह्' ची 'इ' दीर्घ होते

वरील वाक्यांत क्रिया करण्याची इच्छा करणारा अथवा क्रिया करण्याच्या चेतांत असलेला असा अर्थ अधोरेखित शब्दांचा होतो. यांना **भविष्यकाळी धातु. वि.** असें म्हणतात.

हरिष्यन्ति–हरिष्यत्, गमिष्यन्ति–गमिष्यत्, योत्स्यन्ते–योत्स्यमान. हीं रूपें परस्मैपदामध्यें ' स्यत् ' प्रत्यय लावून व आत्मनेपदामध्यें ' स्यमान ' लावून तयार केलीं जातात. यांचीं प. पदी रूपें ' विशत् ' या षष्ठगणाच्या वर्त. धा. सा. विशेषणांप्रमाणें तीन्ही लिंगांत होतात व आ. पदी रूपें अकारान्त विशेषणांप्रमाणें केलीं जातात.

## नवीन शब्द

**अनपेक्षित** ( क. भू. धा. वि. )–अपेक्षा नसलेलें
**अनु+वृत्** ( १ आ. )–अनुसरणें, पाळणें
**अपहरणम्** ( न. )–पळवणें
**अव+गाह्** ( १ आ. )–स्नान करणें
**उद्+सृज्** ( ६ प. )–सोडून देणें
**उपकरणम्** ( न. )–साधन
**उपरत** ( क. भू. धा. वि. )–थांबलेला
**गुप्** ( १ प. गोपायति )–रक्षण करणें
**चक्रवालम्** ( न. )–क्षितिज
**त्रुट्** ( ४, ६ प. )–तुटणें
**दशवक्त्रः** ( पुं. )–रावण, दहा तोंडें असलेला.
**नू** ( ६ प नुवति )–स्तुति करणें
**नौ** ( स्त्री. )–होडी
**प्र+हि** ( ५ प. )–पाठवणें
**बलाकः** ( पुं. )–बगळा
**बुध्** ( ४ आ. )–जागें होणें, जागणें
**महारथः** ( पुं. )–मोठा योद्धा
**महौजस्** ( वि. )–मोठ्या तेजाचा
**भास्वत्** ( पुं. )–सूर्य
**मालिन्यम्** ( न )–काळोख, मलिनपणा.
**लाघवम्** ( न. )–कमीपणा
**शिखा** ( स्त्री. )–ज्योत
**सुभग** ( वि. )–सुंदर, दैववान्

---

### प्रश्न

१ पुढील वाक्यांत कंसांतील धातूंचीं द्वि. भविष्यकाळी रूपें योजा—

१ भयात् रणात् उपरतं ( मन् ) त्वां महारथाः ।
येषां बहुमतो भूत्वा पुनर् ( या ) लाघवम् ॥

२ यक्षः मेघं वदति—( सेव् ) नयनसुभगं खे भवन्तं बलाकाः ।

३ नराः भवसागरं भक्तिनौकया ( तॄ ) ।

४ कुमार्गेण गच्छन्तं नरं सर्वे जनाः ( हा ) न च कोऽपि तं ( त्रै ) ।

५ पार्थः कुरुभिः ( युध् ) ( वि + जि ) च तान् ।

६ कलिः नलस्य शरीरे दुःखेन ( नि + वस् ) इति नागः अवदत् ।

७ महौजसः मुनयः ज्ञानचक्षुषा ईश्वरं ( दृश् ) ।

८ मृतभर्तुः चिताम् ( आ + रुह् ) इत्यवदत्काचित् पतिपरायणा स्त्री ।

९ सेवकाः स्वामिनः चित्तवृत्तिम् अनुवृत्य तं ( प्री ) ।

१० रात्रिः ( गम् ) ( भू ) सुप्रभातम् । भास्वान् ( उद् + इ ) ( हस् ) चक्रवालम् ।

२ पुढील रूपें ओळखून तीं वाक्यांत योजा :—

गास्यन्ति । आरप्स्ये । प्रक्ष्यसि । वोक्ष्यन्ति । अवधाक्ष्यध्वे ।
भन्त्स्यसि । श्रयिष्ये । भङ्क्ष्यामः । प्रहेष्यसि । ताडयिष्यथ ।

३ भविष्यकालवाचक धातु. विशेषणांचा उपयोग कसा करतात हें दोन उदाहरणें घेऊन दाखवा.

---

# पाठ ५

## संकेतार्थ व प्र. भविष्यकाल

१ १ पर्जन्यश्चेदवर्षिष्यत् सुभिक्षमजनिष्यत (अवर्षिष्यत्, अजनिष्यत)

२ किं वाभविष्यदरुणस्तमसां विभेत्ता ( अभविष्यत् )
तं चेत्सहस्रकिरणो धुरि नाकरिष्यत् । ( अकरिष्यत् )

३ हैमं मृगं चेन्नाद्रक्ष्यज्जानक्याश्रमवासिनी । ( अद्रक्ष्यत् )
नापाहरिष्यल्लङ्केशो भिक्षुरूपेण तां खलु ॥ ( अपाहरिष्यत् )

४ गामधास्यत्कथं नागो मृणालमृदुभिः फणैः । (अधास्यत्)
आरसातलमूलात्त्वमवालम्बिष्यथा न चेत् ॥ (अवालम्बिष्यथाः)

वरील वाक्यांचा अर्थ पुढीलप्रमाणें आहे—

१ पाऊस जर पडला असता तर सुबत्ता झाली असती. यावरून असें दिसतें कीं पाऊस पडला नाहीं व सुबत्ताहि झाली नाहीं.

२ जर सूर्यानें अरुणाला अग्रभागीं ठेवला नसता तर तो काळोखाचा नाश करूं शकला असता काय ?–म्हणजे सूर्यानें अरुणाला रथाच्या अग्रभागीं ठेवला आहे व तो काळोखाचा नाश करूं शकला आहे.

३ जर आश्रमांत राहणाऱ्या सीतेनें सुवर्ण-मृग पाहिला नसता तर रावणानें भिकाऱ्याच्या वेशांत सीतेला पळविली नसती–म्हणजे सीतेनें सुवर्णमृग पाहिला व रावणानें तिला पळवून नेली.

४ तूं पातालाच्या तळापासून पृथ्वीला आधार दिला नसतास तर शेषाला कमलाच्या देठांप्रमाणें कोमल अशा आपल्या फणांनी पृथ्वी कशी धरतां आली असती ?—म्हणजे तूं आधार दिलास व शेषाला पृथ्वी धरतां आली.

वरील अर्थावरून असें दिसतें कीं ( १ ) प्रत्येक वाक्याचे दोन भाग असून ते एकमेकांवर अवलंबून आहेत, ( २ ) वाक्याच्या शब्दशः वरवर दिसणाऱ्या अर्थाहून उलट अर्थ ध्वनित होतो, व ( ३ ) क्रियेचा अर्थ भूतकालाला अनुलक्षून आहे. या वाक्यांतील क्रियापदें **संकेतार्था**मध्यें योजलेलीं आहेत.

## पृथक्करण

अधास्यत्–अ+धा+स्यत् । अभविष्यत्–अ+भू ( भो )+इ+स्यत् ।

अवालम्बिष्यथाः–( अव ) अ + लम्ब् + इ + स्यथाः । अकरिष्यत्–अ + कृ ( कर् ) + इ + स्यत् ।

अद्रक्ष्यत् – अ + दृश् ( द्रश् ) + स्यत् । अपाहरिष्यत्–( अप ) अ + हृ ( हर् ) + इ + स्यत् ।

अवर्षिष्यत् – अ + वृष् ( वर्ष् ) + इ + स्यत् । अजनिष्यत – अ + जन् + इ + स्यत ।

या पृथक्करणावरून असें दिसून येतें कीं (१) प्र. भूतकाळाप्रमाणें व्यंजनारंभी धातूपूर्वी 'अ' हा आगम येतो (अर्थात् स्वरारंभी धातूपूर्वी 'आ' येईल व त्याचा आद्य स्वराशीं संधि 'वृद्धि' प्रमाणें होईल); (२) सर्व प्रत्ययांचा आरंभ 'स्य' नें झाला आहे व प्रत्यय 'स्य' ला प्रथमभूतकाळी प्रत्यय जोडून बनविलेले आहेत; व (३) प्रत्ययांपूर्वी धातूंत होणारे फरक व प्रत्ययांपूर्वी जोडण्यांत येणाऱ्या 'इ' संबंधींचे नियम द्वितीय भविष्यकाळाप्रमाणेंच आहेत.

## 'धा' चीं संकेतार्थी रूपें

| प. पद | आ. पद |
|---|---|
| अधास्यम् अधास्याव अधास्याम । | अधास्ये अधास्यावहि अधास्यामहि । |
| अधास्यः अधास्यतम् अधास्यत । | अधास्यथाः अधास्येथाम् अधास्यध्वम् । |
| अधास्यत् अधास्यताम् अधास्यन् । | अधास्यत अधास्येताम् अधास्यन्त । |

### प्रत्यय

**प. प**—स्यम् स्याव स्याम । स्यः स्यतम् स्यत । स्यत् स्यताम् स्यन् ।

**आ. प.**—स्ये स्यावहि स्यामहि । स्यथाः स्येथाम् स्यध्वम् । स्यत स्येताम् स्यन्त ।

टीपः—हे सर्व प्रत्यय पित् आहेत व रूपें करतांना संधिनियमानुसार 'स्' चा ष् होतो.

| धातु | द्वि. भविष्य | संकेतार्थ | धातु | द्वि. भविष्य | संकेतार्थ |
|---|---|---|---|---|---|
| धा– | धास्यति-ते | अधास्यत्-त | दृश्– | द्रक्ष्यति | अद्रक्ष्यत् |
| लम्ब्– | लम्बिष्यसे | अलम्बिष्यथाः | हृ– | हरिष्यति | अहरिष्यत् |
| कृ– | करिष्यति-ते | अकरिष्यत्-त | वृष्– | वर्षिष्यति | अवर्षिष्यत् |
| भू– | भविष्यति | अभविष्यत् | जन्– | जनिष्यते | अजनिष्यत |

यांवरून असें दिसून येईल कीं संकेतार्थाचीं रूपें द्वितीय भविष्यकाळाच्या रूपांप्रमाणेंच होतात व धातूंमध्यें जे फरक द्वि. भविष्य काळांत होतात ते संकेतार्थांतहि कायम राहतात. दोन्ही काळांचे प्रत्यय तेवढे भिन्न आहेत.

**अपवादः**—अधि + इ (आ. प.)—याचीं रूपें दोन प्रकारांनीं होतात.

अध्यैष्ये–अध्यगीष्ये अध्यैष्यावहि–अध्यगीष्यावहि अध्यैष्यामहि–अध्यगीष्यामहि इ.

दुसऱ्या रूपांमध्यें 'इ' बद्दल 'गी' असा आदेश झाला आहे.

## प्रथम भविष्यकाळ

२ १ मोक्षस्य लाभो भविता पुण्येन बहुजन्मनाम् । (होईल)
२ गन्तासि विद्यापारं त्वं चिरं स्थित्वा गृहे गुरोः । (जाशील)
३ विजेता नृपतिः शत्रुं दशवर्षेण सत्यतः । (जिंकील)
४ सोत्साहमुद्यमं कृत्वा लब्धाहे बहुसम्पदम् । (मिळवीन)

वरील वाक्यांतील क्रियापदांचा अर्थ भविष्यकालीन आहे. मात्र भविष्यकाळ आजचा नसून दूरचा आहे. दूरचा भविष्यकाळ दर्शविण्याकरतां प्रथम भविष्यकाळाचा उपयोग करतात, परंतु संस्कृत वाङ्मयामध्यें सर्व भविष्यकाळी क्रिया बहुधा द्वितीय भविष्यकाळानेंच दर्शविल्या जातात.

भविता–भू (भो) + इ + ता । गन्तासि–गम् + तासि ।

विजेता–(वि) + जि (जे) + ता । लब्धाहे–लभ् + ताहे ।

सर्व प्रत्ययांचा आरंभ 'ता' नें झाला आहे. परस्मैपदी व आत्मनेपदी तृ. पु. एकवचनी प्रत्यय 'ता' च आहे. 'भू' या सेट् धातूला प्रत्ययापूर्वी 'इ' हा आगम लावलेला आहे.

## अनिट् धातूंचीं रूपें

| गम् (प. प.) | | | लभ् (आ. प.) | | |
|---|---|---|---|---|---|
| गन्तास्मि | गन्तास्वः | गन्तास्मः | लब्धाहे | लब्धास्वहे | लब्धास्महे |
| गन्तासि | गन्तास्थः | गन्तास्थ | लब्धासे | लब्धासाथे | लब्धाध्वे |
| गन्ता | गन्तारौ | गन्तारः | लब्धा | लब्धारौ | लब्धारः |

## सेट् धातूंचीं रूपें

| भू (प. प.) | | | मुद् (आ. प.) | | |
|---|---|---|---|---|---|
| भवितास्मि | भवितास्वः | भवितास्मः | मोदिताहे | मोदितास्वहे | मोदितास्महे |
| भवितासि | भवितास्थः | भवितास्थ | मोदितासे | मोदितासाथे | मोदिताध्वे |
| भविता | भवितारौ | भवितारः | मोदिता | मोदितारौ | मोदितारः |

# वेट् धातूंचीं रूपें

| सिध् ( प. प. ) | | | त्रप् ( आ. प. ) | | |
|---|---|---|---|---|---|
| सेधितास्मि / सेद्धास्मि | सेधितास्वः / सेद्धास्वः | सेधितास्मः / सेद्धास्मः इ. | त्रपिताहे / त्रप्ताहे | त्रपितास्वहे / त्रप्तास्वहे | त्रपितास्महे / त्रप्तास्महे इ. |

## प्रत्यय

**प. प.**—तास्मि तास्वः तास्मः । तासि तास्थः तास्थ । ता तारौ तारः ।

**आ. प.**—ताहे तास्वहे तास्महे । तासे तासाथे ताध्वे । ता तारौ तारः ।

*टीप:—दोन्ही पदाचे तृ. पुरुषी प्रत्यय सारखे आहेत, व 'अस्' धातूच्या वर्त. रूपांपूर्वी 'ता' जोडून प्रथम व द्वितीयपुरुषी प्रत्यय बनविलेले आहेत.

हे प्रत्यय लागतांना धातूंच्या उपान्त्य ह्रस्व व अन्त्य स्वरांचा गुण झालेला आहे, म्हणून हे प्रत्ययहि 'पित्' आहेत; व प्रत्ययांपूर्वी धातु सेट्, अनिट् व वेट् असेल त्याप्रमाणें 'इ' चा उपयोग केलेला आहे. त्याचप्रमाणें ज्या वेळेला धातूला अनिट् असल्यामुळें प्रत्ययापूर्वी 'इ' जोडली जात नाही त्या वेळेलीं रूपसिद्धीचे नियमांप्रमाणें सन्धि करून रूपें केलेलीं आहेत.

## प्रथम भविष्यकाळाचीं कांहीं अनियमित रूपें

१ सह् ( १ आ. ) –सहिताहे-सोढाहे, लुभ् ( ४ प. ) लोभितास्मि-लोब्धास्मि, इष् ( ४, ६ प. )–एषितास्मि-एष्टास्मि, रुष् ( १, ४ प. )-रोषितास्मि-रोष्टास्मि, रिष् ( १, ४ प. )–रेषितास्मि-रेष्टास्मि । हे धातु 'सेट्' असूनहि 'वेट्' प्रमाणें चालतात.

२ कृप् (१ आ )–कल्पिताहे-कल्प्ताहे-कल्प्तास्मि हा धातु 'वेट्' आहे व तो विकल्पानें परस्मैपदी होतो व त्यावेळी त्याला 'इ' जोडीत नाहीत.

३ दा ( ३. उ. )–दातास्मि-ताहे, गै ( १ प. )–गातास्मि, त्रै ( १ आ. )–त्राताहे, सो ( ४ प. )–सातास्मि.

४ कुट् ( ६ प. )–कुटितास्मि, नू (६ प. )–नुवितास्मि. तसेच त्रुट्, स्फुट्, स्फुर्, तुद्, घू हे सर्व षष्ठ गणाचे आहेत.

५ सृज् ( ६ प. )–स्रष्टास्मि, दृश् ( १ प. )–द्रष्टास्मि. परंतु

सृप् ( १ प )–स्रप्तास्मि-सर्प्तास्मि, स्पृश् ( ६ प. )–स्पर्ष्टास्मि-स्प्रष्टास्मि.

तसेंच इतर उपान्त्य स्वर ह्रस्व 'ऋ' असलेले कृश्, कृष्, मृश् इ. अनिट् धातु.

६ मृज् ( १, २ प. )–मार्जितास्मि-मार्ष्टास्मि । गुह् ( १उ. )–गूहितास्मि-ताहे-गोढास्मि-हे ।

गुप् ( १ प. )–गोपितास्मि-गोप्तास्मि-गोपायितास्मि । नश् ( ४ प. )–नशितास्मि–नंष्टास्मि ।

तृप् ( ४ प. )–तर्पितास्मि, तर्प्तास्मि, त्रप्तास्मि ।

वरील ३ ते ६ विभागांतील धातूंचीं रूपें द्वितीय भविष्यकाळाच्या नियमांप्रमाणेंच झालीं आहेत. वरील धातूंना 'इ' शिवाय प्रत्यय लावतांना रूपसिद्धीचे नियम उपयोगांत आणलेले आहेत.

## कांहीं अधिक रूपें

अद्–अत्तास्मि । आप्–आप्तास्मि । इ-एतास्मि ।

अधि+इ ( आ. प. )–अध्येताहे । नृत्–नर्तितास्मि ।

कॄ–करितास्मि-करीतास्मि ( इतर दीर्घ 'ॠ' कारान्त कॄ प्रमाणें )

क्षम्–क्षमितास्मि-हे, क्षन्तास्मि-हे ।

सम्+गम्–संगन्ताहे । ग्रह्–ग्रहीतास्मि-हे ।

त्यज्–त्यक्तास्मि । दह्-दग्धास्मि । दुह्-दोग्धास्मि-हे ।

मस्ज्–मङ्क्तास्मि । मुच्-मोक्तास्मि-हे । मृ-मर्तास्मि ।

यज्–यष्टास्मि । रुह्-रोढास्मि । वस् ( १ प. प. )–वस्तास्मि ।

विद् ( २ प. प. )–वेत्तास्मि। विद् ( ६ उ. प. )–वेदित्तास्मि-हे, वेत्तास्मि-हे । वृत्-वर्तिताहे । वृध्-वर्धिताहे । ह्वे-ह्वातास्मि । वह् ( १ उ. प. )–वोढास्मि-हे । द्रुह् ( ४ प. प. ) द्रोहितास्मि-द्रोढास्मि-द्रोग्धास्मि । मुह् ( ४ प. प. )–मोहितास्मि-मोढास्मि-मोग्धास्मि । याचप्रमाणें स्नुह् व स्निह्.

बन्ध् ( ९ प. )–बन्द्धास्मि । प्रच्छ्-प्रष्टास्मि । यज् ( १ उ. )–यष्टास्मि-हे ।

युज् ( १ प., ४ आ., ७ उ. )—योक्तास्मि—योक्ताहे । सिच् ( ६ उ. )—सेक्तास्मि-सेक्ताहे ।

**टीप**—प्रथम भविष्यकाळी रूपांवरून तृकारान्त नामें व तुमन्त अव्ययें बनवितां येतात. तृ. पु. ए. वचनी रूपाप्रमाणें तृकारान्त नामाचें प्रथमा एकवचन होतें व ता बद्दल तुम् केलें म्हणजे तुमन्त होतें.

दृश्—द्रष्टास्मि—द्रष्टा ( द्रष्टृ )—द्रष्टुम् । वह्—वोढास्मि—वोढा ( वोढृ )—वोढुम् ।
नी—नेतास्मि—नेता ( नेतृ )—नेतुम् । मुद्—मोदिताहे-मोदिता ( मोदितृ )—मोदितुम् ।

## प्रथम भविष्य, द्वितीय भविष्य व संकेतार्थ यांचीं कर्मणि रूपें

**३ रामेण मित्रं रक्षिष्यते । बालेन फलं भक्षयिष्यते ।**
**ईश्वरेण भक्ताय वरो दास्यते । विदुषा तत्त्वं ज्ञास्यते ।**

वरील उदाहरणें कर्मणि रचनेचीं आहेत हें सहज ध्यानांत येईल. यांतील द्वि. भविष्याची कर्मणि रूपें धातूला आत्मनेपदी प्रत्यक्ष जोडून झालीं आहेत. याचप्रमाणें प्र. भविष्य व संकेतार्थाचीं कर्मणि रूपें आत्मनेपदी प्रत्यय जोडले म्हणजे तयार होतात. सर्व आर्धधातुक काळांना हा नियम लागू आहे.

दा—दास्यते—दायिष्यते । गै—गास्यते—गायिष्यते । नी—नेष्यते—नायिष्यते ।

श्रु—श्रोष्यते—श्राविष्यते । कृ—करिष्यते—कारिष्यते । तॄ—तरिष्यते—तरीष्यते—तारिष्यते ।

स्वरान्त धातूंचीं कर्मणि रूपें दोन दोन होतात. एक आत्मनेपदी प्रत्यय जोडून व दुसरें अन्त्य स्वराची वृद्धि करून, नंतर धातु कोणत्याहि वर्गाचा असला तरी ‘ इ ’ जोडून व आत्मनेपदी प्रत्यय लावून अशीं तयार केलेलीं आहेत. आकारान्त व ए-ऐ-ओ हे अन्त्य स्वर असलेल्या धातूंना ‘ इ ’ पूर्वी ‘ य ’ जोडतात.

हन्—हनिष्यते—घानिष्यते । ग्रह्—ग्रहीष्यते—ग्राहिष्यते । दृश्—द्रक्ष्यते—दर्शिष्यते ।

वरील तीन व्यंजनान्त धातूंचीहि दोन दोन रूपें होतात.

**टीपः**—प्रथम भविष्य व संकेतार्थ यामध्येहि वरीलप्रमाणें स्वरान्त धातूंची व हन्, ग्रह् व दृश् यांची दोन दोन कर्मणि रूपें होतील.

## नवीन शब्द

गो ( स्त्री. )-पृथ्वी
जतुगृहम् ( न. )-लाखेचें घर
मृणालः-म्-कमळाचा देंठ
रसातलम्-पाताळ,पृथ्वीचा तळाचा भाग
विभेत्तृ-फोडणारा, नाश करणारा
सहस्त्रकिरणः-( पुं. )-सूर्य
सुभिक्षम्-( न. )-सुबत्ता, सुकाळ
स्नुह् ( ४ प. )-ओकणें

---

### प्रश्न

१ संकेतार्थाचा उपयोग कोठें करतां येतो हें सोदाहरण दाखवा.

२ पुढील वाक्यांत कंसांतील धातूंचीं योग्य तीं रूपें योजाः—

१ यदि बालः अध्ययनं सम्यक् ( कृ ) तर्हि तेन परीक्षायां यशः प्राप्स्यत ।

२ यदि कृष्णेन सूर्यबिम्बं न (आ+वृ) तर्हि जयद्रथः न अमरिष्यत् ।

३ अर्जुनः रणभूमौ न ( उप+दिश् ) चेत् सः युद्धाय उद्यतः न अभविष्यत् ।

४ यदि दुर्वासाः शकुन्तलां न ( शप् ) दुष्यन्तः तां न ( त्यज् ) ।

५ यदि जतुगृहात्पाण्डवाः न निरगमिष्यन् तर्हि ते ( दह् ) ।

३ पुढील वाक्यांत प्रथम भविष्यकाळी रूपें योजाः—

१ बहुभिः वर्षैः त्वं शास्त्राणि ( ज्ञा ) ।

२ अद्य वा अब्दशतान्ते वा प्राणिनां मृत्युः ( भू ) ।

३ अस्मिन् जन्मनि कृतानां कर्मणां फलम् अन्यस्मिन् जन्मनि त्वं ( लभ् ) ।

४ मनुजानां गात्राणि वार्द्धके शिथिलतां ( गम् ) ।

५ चिरं तपः आचरतः भक्तान् देवाः ( अनु + ग्रह् ) ।

४ पुढील रूपें ओळखून त्यांचा वाक्यांत उपयोग कराः—

सोढाहे, अयोक्ष्यः, उत्तरिता, अगास्यन्, नशितारः ।

---

# पाठ ६

## संख्यावाचक शब्द

१

टीप —१–१९ या संख्यावाचकांची रूपे व उपयोग प्रथम व द्वितीय पुस्तकांत देण्यांत आले आहेत.

**चतसृषु विद्यासु चतुःषष्टौ ( ६४ ) कलासु च प्रावीण्यं लब्धं राजकुमारेण। २ विषमज्वरेणार्तो नरश्चतुर्दशभिरेकविंशत्या ( २१ ) द्वि-द्वाचत्वारिंशता ( ४२ ) चतुरशीत्या ( ८४ ) वा दिनैर्निरामयो भवति। ३ सप्तविंशतेः ( २७ ) नक्षत्राणामधिपतिश्चन्द्रः। ४ सामान्यतः पाठशालासु प्रतिवर्गं त्रिंशच्छात्राः ( ३० ) सन्ति। कदाचित्पञ्चत्रिंशद्वा ( ३५ ) सन्ति। क्वचिच्च पञ्चचत्वारिंशदपि ( ४५ ) दृश्यन्ते। ५ अधिमासे धार्मिका जनास्त्रयस्त्रिंशते ( ३३ ) ब्राह्मणेभ्यो दक्षिणां यच्छन्ति।**

वरील वाक्यांत कंसांत दिलेल्या अर्थाचे संख्यावाचक शब्द योजलेले आहेत.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| चतुःषष्टौ— | सप्तमी | स्त्री. | ए. व. | द्वाचत्वारिंशता — | तृतीया | स्त्री. | ए. व. |
| कलासु— | ,, | ,, | ब. व. | दिनैः— | ,, | न. | ब. व. |
| सप्तविंशतेः— | षष्ठी | ,, | ए. व. | त्रयस्त्रिंशते— | चतुर्थी | स्त्री. | ए. व. |
| नक्षत्राणाम्— | ,, | न. | ब. व. | ब्राह्मणेभ्यः— | ,, | पु. | ब. व. |

यावरून असें दिसतें की २० ते ९९ या संख्यावाचक शब्दांचा ज्या नामाशीं संबंध असेल त्यांचेप्रमाणें विभक्तीत उपयोग केलेला आहे. परंतु ते सर्व पुढील नामांचें लिंग व वचन कोणतेंहि असलें तरी एकाच तऱ्हेनें एकवचनांत चालविलेले आहेत.

त्याचप्रमाणें असेहि दिसून येतें कीं २१ ते २९, ३१ ते ३९ इत्यादि संख्यावाचक शब्द २०, ३०, ४० इत्यादि दशक संख्यावाचकांना ‘ एक ते नव ’ हे

शब्द पूर्वी जोडून बनविलेले आहेत, व हे जोडतांना जरूर ते संधिनियम उपयोगांत आणलेले आहेत.

विंशतिः ( स्त्री. ) २०, त्रिंशत् ( स्त्री. ) ३०, चत्वारिंशत् ( स्त्री. ) ४०, पञ्चाशत् ( स्त्री. ) ५०, षष्टिः ( स्त्री. ) ६०, सप्ततिः ( स्त्री. ) ७०, अशीतिः ( स्त्री. ) ८०, नवतिः ( स्त्री. ) ९०, शतम् ( न. ) १००, सहस्रम् ( न. ) १०००, अयुतम् ( न. ) १०,०००, लक्षम् ( न. ) १,००,०००, प्रयुतम् ( न. ) १०,००,०००, कोटिः ( स्त्री ) १,००,००,००० इ.

## एक ते नव जोडतांना होणारे कांहीं फरक

विंशति त्रिंशत् चत्वारिंशत् पञ्चाशत् षष्टि सप्तमी अशीति नवति

द्वि द्वा द्वा द्वि-द्वा——————→द्वि (द्व्य) द्वि-द्वा

त्रि त्रयो त्रयस्त्रिं...त्रि-त्रयश्च...त्रि-त्रयः... ——→त्रि (त्र्य) त्रि-त्रयो...

चतुर् चतुर्विं...चतुस्त्रिं... चतुश्च ....चतुः——————→चतुरशीति चतुर्ण...

षष् षड् षट्——————————→षडशीति षण्णवति

अष्टन् अष्टा अष्टा अष्ट-अष्टा——————→अष्टाशीति अष्ट-ष्टा

२९—नवविंशति—एकोनत्रिंशत्—ऊनत्रिंशत्—एकान्नत्रिंशत्.

५९—नवपञ्चाशत्—एकोनषष्टि—ऊनषष्टि—एकान्नषष्टि.

१९, २९, ३९......९९ पर्यंतचे संख्यावाचक शब्द पुढील दशकाला एकोन, ऊन व एकान्न हे शब्द जोडूनहि बनवितां येतात. विंशति—षष्टि—सप्तति—अशीति—नवति हे स्त्री. शब्द ' मति ' प्रमाणें चालवावे, व एकवचनी रूपेंच कोणत्याहि लिंगाच्या व वचनाच्या रूपांबरोबर योजावीं. त्रिंशत्, चत्वारिंशत्, पञ्चाशत् हे स्त्री. शब्द ' सम्पद् ' प्रमाणें चालवावे व त्यांची रूपेंहि एकवचनांत योजावीं. शतम् हा शब्द ' वन ' प्रमाणें चालवावा.

टीप.—वरील संख्यावाचक शब्द द्विवचन व बहुवचन यांमध्येंहि चालवितां येतात परंतु त्या वेळी त्यांचा समुदायवाचक अर्थ असतो. जसें—ब्राह्मणानां विंशती—ब्राह्मणांचे विसांचे दोन समुदाय. छात्राणां त्रिशत —विद्यार्थ्यांचे तिसांचे पुष्कळ समूह.

## २ विंशतिपासून शतम् पर्यंतचीं क्रमवाचक विशेषणें

टीपः—१–१९ पर्यंतची क्रमवाचक रूपें दुसऱ्या पुस्तकात दिलेली आहेत.

विंशः–विंशतितमः, एकविंशः–एकविंशतितमः......नवविंशः–नवविंशतितमः
त्रिंशः–त्रिंशत्तमः, एकत्रिंशः–एकत्रिंशत्तमः.........नवत्रिंशः–नवत्रिंशत्तमः
चत्वारिंशः–चत्वारिंशत्तमः, एकचत्वारिंशः–एकचत्वारिंशत्तमः..............
पञ्चाशः–पञ्चाशत्तमः, एकपञ्चाशः–एकपञ्चाशत्तमः...........................
षष्टितमः, एकषष्टः–एकषष्टितमः......................नवषष्टः–नवषष्टितमः
सप्ततितमः, एकसप्ततः–एकसप्ततितमः............नवसप्ततः–नवसप्ततितमः
अशीतितमः, एकाशीतः–एकाशीतितमः............नवाशीतः–नवाशीतितमः
नवतितमः, एकनवतः–एकनवतितमः................नवनवतः–नवनवतितमः
शततमः.

वरील सर्व रूपें अकारान्त आहेत व तीं पुं. व न. मध्यें 'देव व वन' यांप्रमाणें व स्त्री. मध्यें अन्त्य 'अ' बद्दल 'ई' जोडून 'नदी' प्रमाणें चालवतात. विंशति ते नवपञ्चाशत् पर्यंत 'ति किंवा त्' चा लोप करून अथवा तम जोडून हीं रूपें तयार केलेलीं आहेत. त्याचप्रमाणें षष्टि, सप्तति, अशीति, नवति व शत यांना फक्त 'तम' जोडून व इतर मधील संख्यावाचकांच्या अन्त्य 'इ' बद्दल 'अ' जोडून अथवा 'तम' जोडून वरील रूपें तयार केलेलीं आहेत.

टीपः—२१ ते १०० पर्यंतच्या संख्यावाचक शब्दाची क्रमवाचक रूपें तम जोडून करता येतातच व त्याशिवाय ६०, ७०, ८०, ९० व १०० यांशिवाय इतर संख्यावाचकांचीं दुसऱ्या तऱ्हेनें होतात.

## ३ शंभराहून ज्यास्त मोठ्या संख्या

नराणां द्वे शते–द्विशतं नराः ( २०० मनुष्य ), नगराणां चत्वारि शतानि–चतुःशतं नगराणि ( ४०० शहरें ), देवतानां षट् सहस्राणि–षट्सहस्रं देवताः ( ६००० देवता ), नराणां विंशतिः सहस्राणि–विंशतिसहस्रं नराः ( २०००० लोक )

वरील संख्या दोन प्रकारांनीं लिहिलेल्या आहेत. १ दोन्ही संख्यावाचकांचीं योग्य रूपें योजून आणि २ द्विगु समास करून.

१, २, ०५ मनुष्य–पञ्चाधिकद्विशताधिकसहस्रम् नराः ।

२४,६,२५ स्त्रिया–पञ्चविंशत्युत्तरषट्शतोत्तरचतुर्विंशतिसहस्रं स्त्रियः।

१, ३९ घरें–नवत्रिंशदधिकशतं गृहाणि। शतं नवत्रिंशत् च गृहाणि।

वरील उदाहरणांवरून शंभराहून मोठ्या संख्या संस्कृतामध्यें कशा लिहावयाच्या हें दिसून येईल. साधारणतः सर्व संख्येचे, शंभराच्या आंतील, शेंकडे, हजार इ. असे भाग करावे व त्यांच्यामध्यें अधिक किंवा उत्तर असे शब्द घालून व संधि-नियमाप्रमाणें जोडून शेवटील अत्युच्च संख्याविभागाचें विशेषण करावें. जसें पहिल्या संख्येंत सहस्रम् याचें विशेषण आहे, व दुसऱ्यामध्यें चतुर्विंशतिसहस्रम् याचें विशेषण आहे. **अशा रीतीनें एका समासांत योजलेल्या संख्या एकवचनांत व अन्त्य शब्दाच्या लिंगाप्रमाणें चालवाव्या लागतात. पुढील नामाचें लिंग व वचन कांहींहि असो.**

२५४०९ शिपाई–नवशून्यचतुःपञ्चद्विमिताः–सङ्ख्याकाः सैनिकाः।

४३९०७३ प्रजा–त्रिसप्तशून्यनवत्रिचतुर्मिताः–सङ्ख्याकाः प्रजाः।

फार मोठ्या संख्या तयार करतांना संख्येंतील आंकडे डावीकडून उजवीकडे मांडावयाचे ( ० बद्दल शून्य ) व शेवटीं मित किंवा सङ्ख्याक असे विशेषणार्थी शब्द जोडून सर्व सामासिक पद योग्य त्या नामाचें विशेषण करावयाचें व नामाच्या लिंग, विभक्ति व वचन यांप्रमाणें त्याचें रूप करावयाचें.

इ. स. १९३७ सालीं–क्रिस्ताब्दस्य सप्तत्रिनवैकमिते संवत्सरे। किंवा
„ सप्तत्रिंशदधिकनवदशशततमे संवत्सरे।

अमुक वर्षीं किंवा अमुक वर्षे असा अर्थ दर्शविण्याकरितां पहिल्यानें वरील कोणत्याहि प्रकारांप्रमाणें संख्या तयार करावी व त्याला 'तम' जोडून विशेषण तयार करावें किंवा वरीलप्रमाणें 'मित' 'किंवा' 'सङ्ख्याक' जोडून विशेषण तयार करावें.

## ४ संख्यावाचक समूहदर्शक शब्द

**माता मित्रं पिता चेति स्वभावात् त्रितयं हितम्।**
**आमयात्यौषधं सम्यग्गृह्णीयाद्दिनसप्तकम्।**

संख्यावाचकांपासून समूहवाचक शब्द तयार करतां येतात.

द्वयम्—द्वितयम्, त्रयम्—त्रितयम्, चतुष्टयम्—चतुष्कम्, पञ्चकम्, षट्कम्, सप्तकम्, अष्टकम्, नवकम्, दशकम् इ.

---

## प्रश्न

१ पुढील वाक्यांत दिलेल्या संख्यावाचक शब्दांचीं योग्य रूपें योजाः—

१ तेन नरेण ( २५ ) दिनानि किमपि न भक्षितम् ।

२ गीतायाः ( १८ व्या ) अध्याये ( ७८ ) श्लोकाः सन्ति ।

३ अस्मिन्पुस्तके ( ९६ व्या ) पृष्ठे मनोहरं चित्रं वर्तते ।

४ गोपालः ( ६२ ) बालेषु ( पहिला ) आसीत् ।

५ सेनापतिना सैनिकानां ( ५३ ) पङ्क्तयः कृताः ।

६ मम ग्रामे ( ३८ ) गृहाणि सन्ति । तेषां ( २५ व्या ) गृहे अहं वसामि ।

७ अस्य मासस्य ( ३१ ) दिनानि सन्ति । अद्य ( २९ वा ) दिवसः ।

८ गोविन्दः मह्यं ( ९५ ) रूपकान् *अधारयत् । तेषां ( ४५ ) रूपकाः तेन दत्ताः ।

९ ( १७६१ ) वर्षे पानिपते नाम नगरे महाराष्ट्रीयाः सैनिकाः पराजिताः ।

१० मम ग्रामे ( १५४०७ ) जनाः निवसन्ति । तेषां ( २५१६ ) गृहाणि सन्ति ।

२ पुढील मराठी शब्दसमूहांचें संस्कृत भाषान्तर कराः—
६० वी कला, २२ गोष्टी, ७२ वा श्लोक, ४९ वस्तु, ६८ शाळा, इ. स. १९३८ साल, १० श्लोकांचा समूह, ३६० दिवस, चव्हाटा, चार सुना.

३ १२—२२......९२, १३—२३......९३, १६—२६......९६, १८—२८......९८, १९—१९......९९ या संख्या संस्कृतमध्यें लिहा व त्यांचा भिन्न लिंगांच्या नामांशीं कसा उपयोग होतो हें दर्शवा.

---

*'धृ—देणें असणें' याचा उपयोग ज्याचें देणें त्या अर्थाच्या शब्दाची चतुर्थी योजून करतात.

# पाठ ७

## (अ) तारतम्यवाचक रूपें (ईयस् व इष्ठ प्रत्ययान्त)

२ शक्तेर्युक्तिर्बलीयसी बलवत्तरा वा। सिंहः सर्वेषु पशुषु सर्वेषां पशूनां या बलिष्ठो बलवत्तमो वा। रामस्य पराक्रमो रावणस्य पराक्रमान्महीयान् महत्तरो वा। सर्वेषां फलानां सर्वेषु फलेषु वाऽऽम्रं स्वादिष्ठं स्वादुतमं वा। कृपणानां मनो लघुतरं लघीयो वा वर्तते। उदाराणां तु महत्तमं महिष्ठं वा भवति। साधुः शुचिष्ठया शुचितमया वा वृत्त्याऽऽवृतो भवति।

वरील वाक्यांत तारतम्यवाचक रूपें दोन दोन प्रकारचीं आहेत. त्यांतील तर–तमप्रत्ययान्त रूपांची माहिती दुसऱ्या पुस्तकामध्यें आलेली आहे. पुढील पृथक्करणावरून दुसरीं रूपें कशीं करतात हें समजून येईल.

महत्+ईयस्–मह्+ईयस्–महीयस्। महत्+इष्ठ–मह्+इष्ठ–महिष्ठ।

लघु+ईयस्–लघ्+ईयस्–लघीयस्। लघु+इष्ठ–लघ्+इष्ठ–लघिष्ठ।

स्वादु+ईयस्–स्वाद्+ईयस्–स्वादीयस्। स्वादु+इष्ठ–स्वाद्+इष्ठ–स्वादिष्ठ।

शुचि+ईयस्–शुच्+ईयस्–शुचीयस्। शुचि+इष्ठ–शुच्+इष्ठ–शुचिष्ठ।

बलवत्+ईयस्–बल+ईयस्–बल्+ईयस्–बलीयस्।

बलवत्+इष्ठ–बल+इष्ठ–बल्+इष्ठ–बलिष्ठ।

वरील पृथक्करणावरून असें दिसून येईल कीं—

१ मूळ गुणविशेषणाच्या अन्त्य स्वराचा अथवा अन्त्य व्यंजन व उपान्त्य स्वर यांचा लोप करून नंतर **ईयस्** व **इष्ठ** जोडतात.

२ वत् व त्याचप्रमाणें मत्, इन् व विन् हे प्रत्यय लागून झालेल्या विशेषणांतील प्रत्यय काढून नंतर अन्त्य स्वराचा किंवा अन्त्य व्यंजन व उपान्त्य स्वर यांचा लोप करून **ईयस्** व **इष्ठ** जोडतात.

३ **ईयस्** व **इष्ठ** हे प्रत्यय फक्त **गुण**विशेषणांनाच लावतां येतात.

पृथु – प्रथ् + ईयस् – इष्ठ – प्रथीयस् –प्रथिष्ठ । मृदु–म्रद्+ईयस्–इष्ठ–म्रदीयस् – म्रदिष्ठ । दृढ – द्रढ् + ईयस् – इष्ठ – द्रढीयस् – द्रढिष्ठ ।

पृथु, मृदु, दृढ, भृश, व परिवृढ यांच्या उपान्त्य 'ऋ' चा र् होतो, व अन्त्य स्वराचा लोप होतो. परंतु ऋजु याचीं ऋजीयस्–ऋजिष्ठ अशींच रूपें होतात.

## कांहीं अनियमित रूपें

**अन्तिक** ( जवळ )–नेदीयस्-नेदिष्ठ
**उरु** ( रुंद )–वरीयस्-वरिष्ठ
**क्षुद्र**–( हलका )–क्षोदीयस्-क्षोदिष्ठ
**दीर्घ** ( लांब )–द्राघीयस्-द्राघिष्ठ
**दूर** ( लांब )–दवीयस्-दविष्ठ
**क्षिप्र** ( जलद )–क्षेपीयस्-क्षेपिष्ठ
**गुरु** ( जड-मोठा )–गरीयस्-गरिष्ठ
**प्रिय** ( आवडता )–प्रेयस्-प्रेष्ठ
**बहु** ( पुष्कळ )–भूयस्-भूयिष्ठ
**स्थिर** ( न हालणारा )–स्थेयस्-स्थेष्ठ
**ह्रस्व** ( आखूड )–ह्रसीयस्-ह्रसिष्ठ

**अल्प** ( लहान )–अल्पीयस्-अल्पिष्ठ
कनीयस्-कनिष्ठ
**प्रशस्य** ( स्तुत्य )–श्रेयस्-श्रेष्ठ
ज्यायस्-ज्येष्ठ
**बाढ-साधु** ( चांगला )–साधीयस्
-साधिष्ठ
**स्थूल** ( जाड )–स्थवीयस्-स्थविष्ठ
**बहुल** ( पुष्कळ )–बंहीयस्-बंहिष्ठ
**युवन्** ( तरुण )–यवीयस्-यविष्ठ
कनीयस्-कनिष्ठ
**वृद्ध** ( वयानें मोठा )–वर्षीयस्-वर्षिष्ठ
ज्यायस्-ज्येष्ठ

**टीप**:–१ कधीं कधी **ईयस्–इष्ठ** याचे जोडीला **तर–तम** सुद्धा लावतात व त्यामुळें अर्थ जोरदार होतो. श्रेयस्तर, श्रेष्ठतर, श्रेष्ठतम, पापीयस्तर, पापीयस्तम.

२ वरील गुणविशेषणाची तर–तम लावूनहि रूपें करता येतात.

३ दुसऱ्या **पुस्त**कात सांगितल्याप्रमाणेंच ईयस् व इष्ठ प्रत्यययुक्त रूपांचा उपयोग होतो. नेहमी तुलनात्मक अर्थ पाहिजेच असें नाहीं.

'ईयस्' प्रत्ययान्त विशेषणें प्रथम पुस्तक पाठ २३ मधील 'श्रेयस्' प्रमाणें तीन्ही लिंगांमध्यें चालवावीं. 'इष्ठ' प्रत्ययान्त विशेषणें 'देव, वन व माला' यांप्रमाणें तीन्ही लिंगांमध्यें चालवावीं.

## ( आ ) मत्वर्थीय रूपें ( वत्, मत्, इन्, विन् प्रत्ययान्त )

२ प्रज्ञावतां न खलु किमप्यगम्यम् । अन्धो धनमदवतां सुखानि

नेक्षते । बुद्धिमतां न कोऽप्यविषयो भवति । उद्योगेन नरो यशस्वान् भवति । अंशुमत आतपोऽसह्यो भवति निदाघे ।

वरील वाक्यांत नामांना वत् व मत् लावून होणारीं स्वामित्वदर्शक विशेषणें योजलेलीं आहेत. मूळचा प्रत्यय 'मत्' आहे, परंतु अ–आ व म् हे वर्ण अन्त्य किंवा उपान्त्य असणाऱ्या शब्दांना जोडतांना 'म' चा 'व' होतो. जसें–विद्यावत्, यशस्वत्, भास्वत्, लक्ष्मीवत् ।

अपवादः—यव–यवमत्, भूमि–भूमिमत्. तसेंच ऊर्मि, कृमि, इक्षु, मधु, ककुद्, गरुत्, यांनाहि 'मत्' जोडतात. परंतु—विद्युत्–विद्युत्वत् । तडित्–तडित्वत् ।

धनिनां पुत्रादपि भीतिः । मेधाविनि छात्रे स्निह्यति गुरुः । सुखिभिरनुभूयते हर्षः । मायाविना राक्षसेन रामः सुदूरमाकृष्टः ।

वरील वाक्यांतहि इन्-विन् हे मत्वर्थीय प्रत्यय जोडून होणारीं स्वामित्वदर्शक विशेषणें योजलेलीं आहेत.

इन् हा अकारान्त नामें व माया, शाला, शिखा, माला, दंष्ट्रा, वलाका यांना जोडतात व विन् हा स-कारान्त नामें व माया, मेधा व स्रज् यांना जोडतात. 'आमय' याला जोडतांना 'य' चा 'या' होतो जसें—'आमयाविन्' 'स्रज्-स्रग्विन्' 'वाच्' या शब्दाला 'मिन्' प्रत्यय लावून 'वाग्मिन्' असा शब्द होतो.

टीप—वत्–मत् प्रत्ययान्त विशेषणें पुस्तक १ पाठ २१ मधील 'गुणवत्' प्रमाणें आणि 'इन्–विन्' प्रत्ययान्त विशेषणें पु. १ पाठ २२ मधील 'भाविन्' प्रमाणें चालवावी

## (इ) 'च्वि' रूपें

२ येन शुक्लीकृता हंसाः शुकाश्च हरितीकृताः ।
मयूराश्चित्रिता येन स ते वृत्तिं विधास्यति ॥
शुचीभवन्ति पाप्मानः स्नात्वा भागीरथीजले ।
भस्मीचकार कपिलः सगरस्यात्मजान् रुषा ।

वरील वाक्यांत **शुक्ल, शुचि** व **भस्मन्** यांना **कृ** व **भू** चीं रूपें लावलेलीं असून त्यापूर्वी मूळ शब्दांत फेरफार झालेला आहे. या तऱ्हेच्या रूपांचा अर्थ मूळ शब्दानें दर्शविलेली स्थिति होणें किंवा घडवून आणणें असा आहे.

शुक्लीकृताः—न शुक्लाः-अशुक्लाः । अशुक्लाः शुक्लाः सम्पद्यन्ते तथा कृताः ।

शुचीभवन्ति—न शुचिः अशुचिः । अशुचिः शुचिः सम्पद्यते तथा भवन्ति ।

भस्मीचकार—न भस्म अभस्म । अभस्म भस्म सम्पद्यते तथा चकार ।

या रूपांना **च्वि** रूपें म्हणतात. ' अभूततद्भावे च्विः ' असें सूत्र आहे.

मुळांत एखाद्या गोष्टीसारखें नसतांना त्यासारखें होणें अथवा करणें अशा अर्थाच्या रूपांना ' च्वि ' रूपें म्हणतात.

शुक्ल—शुक्लीकृताः । शुचि—शुचीभवन्ति । पटु—पटूकरोति ।

मातृ—मात्रीकृता । भस्मन्—भस्मीकृताः । विचेतस्—विचेतीकरोति । परंतु

दिवा—दिवाभूता । तूष्णीम्—तूष्णींभवति ।

वरील रूपांवरून मूळ शब्दांमध्यें काय फरक होतात हें लक्षांत येईल. अन्त्य अ किंवा आ बद्दल ई येते, इ व उ यांच्याबद्दल ई व ऊ होतात, ऋ बद्दल री आणि अन्त्य न् किंवा स् यांचा लोप होऊन पूर्वीच्या स्वरांमध्यें वरील बदल होतो. परंतु अव्ययांला कृ किंवा भू चीं रूपें जोडलीं तर त्यांमध्यें कांहीं फरक होत नाहीं.

## ( ई ) गतिधातु

४ अन्तर्दधे नलं दृष्ट्वा नागः कर्कोटको वने ।

नारायणं नमस्कृत्य ग्रन्थं विवृणुयाद्गुरुः ।

आविः-प्रादुर्बभूव श्रीविष्णुर्ध्रुवस्य पुरतः स्वयम् ।

तिरोहितो यमो दत्त्वा प्राणान् सत्यवतस्तदा ।

सकलाः सम्पदो यान्ति कविं भूपपुरस्कृतम् ।

वरील वाक्यांतील क्रियापदांना **अन्तर्, नमस्, प्रादुस्, आविस्, तिरस्** व **पुरस्** हीं क्रियाविशेषण अव्ययें उपसर्गाप्रमाणेंच जोडलेलीं आहेत. यांना **गतिधातु** म्हणतात. अशा तऱ्हेचीं आणखी क्रियापदें:—

उररी–ऊरी कृ–स्वीकार करणें, साक्षात्कृ–उघड करणें, मिथ्याकृ–खोटें करणें, वशेकृ–ताब्यांत आणणें, अस्तंगम्–अस्तास जाणें.

टीपः—च्विरूपें व गतिधातु याची ल्यबन्त रूपें उपसर्गसहित धातूंप्रमाणेंच होतात. शुचीकृत्य, विशदीकृत्य, आविर्भूय, अन्तर्धाय, तिरोभूय.

## नवीन शब्द

**अणु** ( वि. )–फार लहान
**आर्चिस्** ( स्त्री. )–ज्वाळा
**आमयः** ( पुं. )–रोग, आजार
**इक्षुः** ( पुं. )–ऊंस
**ऊर्मिः** ( स्त्री. )–लाट
**ऋजु** ( वि. )–सरळ
**ककुद्** ( स्त्री. )–कोळें, शिखर
**गरुत्** ( पुं. )–पंख
**तडित्** ( स्त्री. )–वीज
**परिवृढ** ( वि. )—घट्ट, मोठा
**भगः** ( पुं. )–देव
**माया** ( स्त्री. )–कपट, जादू
**रुष्** ( स्त्री. )–राग
**विद्युत्** ( स्त्री. )–वीज

---

### प्रश्न

१ पुढील रूपें ओळखून वाक्यांत योजाः—बलीयसी। ज्येष्ठा। प्रेयसी। ज्यायान्। द्राघिष्ठा। नेदीयान्। म्रदीयः। गरीयान्। अणीयान्। स्थवीयान्

२ पुढील शब्दसमुच्चयांबद्दल एकेक संस्कृत रूप योजाः—( अर्थ ) विशद करून, हुषार होतो, गोड केलें, सर्वांत हुषार, थोडासा आखूड ( दोरा ), दासी बनविण्याकरितां, सर्वांत हलक्या मनाचा, ज्यास्त मंद बुद्धीचा, सरळ केलेली, सर्वांत वेगवान्, अदृश्य होऊन, समोर उभा राहिला.

३ पुढील शब्दांचीं मत्वर्थीय रूपें तयार कराः—तेजस्, माला, गुण, भग, शोभा, कला, ऊर्मि, शक्ति, विद्युत्, अर्चिस्,

४ खालील विशेषणसमूह व नामसमूह यांच्या योग्य जोडया लावून त्यांचा वाक्यांत उपयोग कराः—

वि.—महिष्ठ। द्राघिष्ठ। धनवत्तम। उच्चैस्तम। तमस्विन्।

ना.—रात्रिः। कुबेरः। ईश्वरः। गङ्गा। हिमालयः।

# पाठ ८

## प्रयोजक क्रियापदें



टीप:—धातूंची प्रयोजक रूपें ही सामान्यतः दशम गणाच्या धातूप्रमाणेच तयार करतात व निरनिराळ्या काळांमध्यें चालविता येतात हें सं. भाषाप्रदीप-पु. १ यामध्यें सांगितलेलें आहे.

**१ विश्वामित्रो दशरथं रामलक्ष्मणावयाचत । अतस्तेन सह दशरथस्तौ प्रास्थापयत्। मार्गे तौ बहून् राक्षसान् व्यापादयेताम्। निर्विघ्नं समाप्ते यज्ञे विश्वामित्रस्तौ सीतास्वयंवरमगमयत । तत्र गत्वा रामः शिवधनुरनामयदभनक् च। अतः सीता तस्य कण्ठे पुष्पमालामस्थापयत । परन्तु परशुराममक्रोधयदेतद्रामस्य कृत्यम् । अतः स राममात्मना सहायोधयत् । तदा रामः स्वपराक्रमेण तमतोषयत् ।**

वरील उताऱ्यांतील अधोरेखित रूपें **प्रयोजक** असून भूतकाळीं आहेत हें ध्यानांत येईल. त्याचप्रमाणें त्यांचा अर्थ मूळ धातूनें दर्शविलेली क्रिया दुसऱ्या कोणाकडून तरी करविली गेली आहे असा आहे हेंहि ध्यानांत येईल. रामलक्ष्मणौ प्रातिष्ठेताम्–रामलक्ष्मण निघाले ( मूळ वाक्य ). दशरथः रामलक्ष्मणौ प्रास्थापयत्-दशरथानें रामलक्ष्मणांना निघावयास लावलें म्हणजे पाठवलें ( प्रयोजक वाक्य )–असेंच इतर रूपांसंबंधीं दाखवितां येईल. बहवो राक्षसा व्यापद्यन्त–तौ बहून् राक्षसान् व्यापादयेताम् ।

प्रास्थापयत्—( प्र ) अ + स्था – स्थाप् + अय + त् । अक्रोधयत्— अ + क्रुध् – क्रोध् + अय + त् । व्यापादयेताम्—( व्या ) अ + पद् – पाद् + अय + इताम् । अयोधयत्—अ + युध् – योध् + अय + त् । अगमयत—अ + गम् + अय + त । अस्थापयत्—अ + स्था – स्थाप् + अय + त् । अनामयत्—अ + नम् – नाम् + अय + त् । अतोषयत्—अ + तुष् – तोष् + अय + त् ।

या पृथक्करणावरून असे दिसून येतें की (१) धातूला 'अय' जोडून प्रयोजक रूप बनतें, (२) प्रयोजक रूप परस्मैपदी किंवा आत्मनेपदी धातूचें असलें तरी सामान्यतः तें दोन्ही पदांमध्यें चालविता येतें, (३) सामान्यपणें अन्त्य स्वराची व उपान्त्य 'अ' ची वृद्धि होते आणि उपान्त्य ह्रस्व स्वराचा गुण होतो.

## वरील सामान्य नियमाला पुढील अपवाद आहेत

१ स्था—स्थापयति, दा-दे-दो—दापयति, धा—धापयति, हा—हापयति, मा—मापयति, गै—गापयति, या—यापयति व 'पा'शिवाय इतर द्वितीय गणाचे आकारान्त धातु 'या' प्रमाणे.

आकारान्त व ए, ऐ व ओ हे अन्त्य स्वर असणाऱ्या धातूंना प्रयोजकाच्या 'अय' पूर्वी 'प्' जोडला जातो; परन्तु—

शो – सो – छो (४ प)—शाययति – साययति – छाययति, पा (१ प.)—पाययति, पा (२ प.)—पालयति, क्षै—क्षपयति, ह्वे—ह्वाययति, ज्ञा (९ उ.)—ज्ञपयति-ज्ञापयति, ग्लै—ग्लपयति-ग्लापयति, स्ना—स्नपयति, स्नापयति. ग्लै व स्ना यांना उपसर्ग जोडला म्हणजे फक्त (प्र) स्नापयति, व (प्र) ग्लापयति अशी रूपें होतात

२ ऋ—अर्पयति, ह्री—ह्रेपयति, जि—जापयति, क्री—क्रापयति, रभ्—रम्भयति, लभ्—लम्भयति, हन्—घातयति, रुह्—रोहयति-रोपयति, मृज्—मार्जयति, प्री (९–१० उ.)—प्रीणयति, धू (१, ५, १० उ.)—धूनयति, मस्ज्—मज्जयति, भ्रस्ज्—भर्जयति-भ्रज्जयति, गुप्—गोपाययति-गोपयति गुह् (१ उ.)—गूहयति, ३

## नियमानुसार होणारीं कांहीं रूपें

कृ—कारयति, नी—नाययति श्रि—श्राययति, श्रु—श्रावयति, भू—भावयति, [illegible], हृ—हारयति.

पठ्—पाठयति, [illegible], [illegible], मन्—मानयति, [illegible] [illegible], [illegible], [illegible]

भिद्–भेदयति मुह्–मोहयति, क्लृप्–कल्पयति, वृध्–वर्धयति, परंतु निन्द्–निन्दयति, जीव्–जीवयति, भाष्–भाषयति, वेप्–वेपयति.

३ गम्–गमयति, क्रम्–क्रमयति, रम्–रमयति, क्षम्–क्षमयति परंतु कम्–कामयते, यम्–यामयति, नम्–नमयति-नामयति, चम्–चामयति, शम् ( पाहणे )–शामयति.

घट्–घटयति, जन्–जनयति, व्यथ्–व्यथयति, त्वर्–त्वरयति, ध्वन्–ध्वनयति

वरील धातूंत उपान्त्य ‘ अ ’ ची वृद्धि होत नाही.

४ इ–गमयति, प्रति + इ–प्रत्याययति, अधि + इ ( आ. )–अध्यापयति, अधि + इ ( प. )–अधिगमयति; स्मृ–स्मारयति-स्मरयति ( शोकपूर्ण आठवण करवणे ), मद्-मदयति ( आनन्दित करणें )–मादयति ( उन्मत्त करणें ), सिध्–साधयति ( मिळविणें )-( नि-प्रति ) सेधयति ( अडविणें ), स्मि–स्माययति ( हसायला लावणें )-स्मापयते ( आश्चर्यचकित करणें ), भी–भाययति ( धमकावणें )-भीषयते–भापयते ( भिवविणे ), जॄ–जरयति.

टीप--बुध् ( ४ आ. ), युध्, नश्, जन्, अधि + इ ( २ आ. ), प्रु, द्रु व स्रु यांची प्रयोजक रूपें बहुधा प. पदीच होतात व धे, पा ( १ प. ), दम्, आ + यम्, आ + यस्, परि + मुह्, रुच्, नृत्, वम्, ( १ प. ), अभि + वद् यांची प्रयोजक रूपें बहुधा आ. पदी होतात

## प्रयोजक क्रियापदाचीं सर्व काळ व अर्थ यांमधील रूपें

२ पुत्रः पितरं तोषयति । रामो दशरथमतोषयत् । तोषयन्तु नृपाः प्रजाः । शिष्यो गुरुं तोषयेत् । ध्रुवो विष्णुं तोषयाञ्चकार । आज्ञाधारकः सेवकः स्वामिनं तोषयिष्यति । मुनिर्बहुभिर्वर्षैरीश्वरं तपोभिस्तोषयिता । यदि शिवमर्जुनो नातोषयिष्यत् तर्हि स नालप्स्यत पाशुपतास्त्रम् । सावित्री यमं स्वपतिनिमित्तमतूतुषत् । नर ईश्वरं भक्त्या तोष्यात् ।

वरील वाक्यांवरून हें समजून येईल कीं, प्रयोजक रूपें दहाव्या गणाच्या धातूं-प्रमाणें दाही काळ व अर्थ यांमध्यें चालवितां येतात.

| मूळ वाक्य | | प्रयोजक वाक्य |
| --- | --- | --- |
| सैनिकाः तिष्ठन्ति | — | सेनापतिः सैनिकान् स्थापयति । |
| माता मोदते | — | बालः मातरं मोदयते । |
| समुद्रः क्षुभ्यति | — | वायुः समुद्रं क्षोभयति । |

वरील वाक्यसमूहावरून हें दिसून येईल कीं अकर्मक क्रियापदें असणाऱ्या वाक्यांचें प्रयोजक वाक्यांत रूपान्तर करतांना मूळ वाक्यांतील कर्तृपदें द्वितीयेंत योजतात.

| | | |
| --- | --- | --- |
| सचिवः पारितोषिकं यच्छति | — | नृपः सचिवेन पारितोषिकं दापयति । |
| सूदः अन्नं पचति | — | स्वामी सूदेन अन्नं पाचयति । |
| सैनिकाः शत्रुं घ्नन्ति | — | नृपः सैनिकैः शत्रुं घातयति । |
| बालः अध्ययनम् आरभते | — | पिता बालेन अध्ययनम् आरम्भयति । |

वरील वाक्यसमूहांवरून हें दिसून येईल कीं सकर्मक क्रियापद असणाऱ्या वाक्यांचें प्रयोजक वाक्यांत रूपांतर करतांना मूळ वाक्यांतील कर्तृपदें तृतीयेंत योजतात.

टीप—वरील नियमाना अपवाद असणारी प्रयोजक वाक्यें चौदाव्या पाठांत दिलीं आहेत.

---

## प्रश्न

१ पुढील वाक्यांची मूळ वाक्यें लिहाः—

१ पुत्रस्य यशः मातरं मोदयति । २ मुनिवराः यज्ञकर्माणि प्रवर्तयन्ति । ३ ईश्वरः बलेः शिरसि वामनेन पदं न्यधापयत् । ४ सुग्रीवः मारुतिना लङ्काम् अदाहयत् । ५ नराः उद्योगेन सम्पद वर्धयन्ताम् ।

२ पुढील वाक्यांचीं प्रयोजक वाक्यें कराः—

१ रङ्गभूमौ नटाः नृत्यन्ति । २ सचिवः सैनिकेभ्यः पारितोषिकाणि अददात् । ३ व्याधयः शरीरे उत्पद्यन्ते । ४ गोपालः गां पयः

अधोक्‌ । ५ सैनिकाः विराटस्य गाः अचोरयन्‌ ६ वानराः लङ्कां रुरुधुः ।

३ पुढील रूपें ओळखून वाक्यांत उपयोग कराः—

व्यापादयामास । आरम्भयन्तु । अघातयिष्यत्‌ । पालयामास प्रतारयेयुः । व्यजापयन्त । क्षापयांचक्रुः । न्यरोधयन्‌ । योधयन्ति । अर्पयिष्यन्ति ।

४ पुढील रूपांच्या जोडया अर्थ स्पष्ट होईल अशा रीतीनें वाक्यांत योजाः—

अध्यापयति–अधिगमयति । स्माययति–स्मापयते । साधयति-सेधयति । पालयति–पाययति । रोहयति–रोपयति ।

५ प्रयोजक क्रियापदांचा अर्थ मूळ क्रियापदांच्या अर्थाहून कसा बदलतो हें संस्कृत वाक्यांच्या साहाय्यानें दाखवा. त्याचप्रमाणें दहाव्या गणाच्या धातूंची मूळ रूपें व प्रयोजक रूपें योजलेलीं अशीं दोन वाक्यें लिहा.

---

# पाठ ९

## समास ( द्वन्द्व–अव्ययीभाव )

### द्वन्द्व

रामलक्ष्मणौ, नरनार्यः व कन्दमूलफलानि यांना द्वन्द्व समास कां म्हणतात याबद्दल माहिती दुसऱ्या पुस्तकांत ११ व्या पाठांत दिलेली आहे.

१ गन्धाक्षतपुष्पेण भक्तो देवं पूजयति ।

( गन्ध, अक्षता, फुले इत्यादि वस्तूंनीं )

आहारनिद्राभयम्‌ नैसर्गिकं प्राणिनाम्‌ ।

( जेवण, झोंप, भीति वगैरे )

भक्तितपोदानेन नरः पुण्यवान्भवति ।

( भक्ति, तपश्चर्या, दान इत्यादि गोष्टींनी )

वरील अधोरेखित समासांतील पदें समान महत्त्वाचींच आहेत म्हणून याला द्वन्द्व समास म्हटलें पाहिजे; परंतु या समासांतील पदांचा अर्थ निरनिराळा नसून

समूहवाचक आहे व तो समूहवाचक आहे हें दर्शविण्याकरितां समासाचें रूप नपुंसकलिंगी एकवचनी झालें आहे. या समासांना ' **समाहार द्वन्द्व** ' म्हणतात. अर्थात् सामान्य द्वन्द्व समासाला ' **इतरेतर द्वन्द्व** ' असें म्हणतात. यांचा विग्रह पुढीलप्रमाणें करतात.

गन्धः अक्षताः पुष्पाणि च एतेषां समाहारः—गन्धा......ष्पम् ।

आहारः निद्रा भय च ,, ,, —आहार......यम् ।

भक्तिः तपः दानं च ,, ,, —भक्ति......नम् ।

टीप—समासांतील पदें कोणत्याहि लिंगांचीं व वचनांचीं असलीं तरी समासाचें रूप नपुंसकलिंगी एकवचनी असतें. समास समाहार द्वन्द्व करावा का इतरेतर द्वन्द्व करावा हें अर्थानुरूप बोलणाराच्या मर्जीवर अवलंबून असतें.

समासांतील पदें एकत्र जोडताना तीं शेवटच्या पदाशिवाय मूळ स्वरूपांतच सन्धिनियमानुसार जोडावीं लागतात. मात्र ' न् ' कारान्त शब्दांच्या ' न् ' चा लोप होतो. आत्मनः सुखम्–आत्मसुखम् । शशिनः कलाः–शशिकलाः । परंतु मनसः विकारः–मनोविकारः, विदुषां समूहः–विद्वत्समूहः ।

२ **ब्राह्मणो भोजनात्पूर्वं हस्तपादं क्षालयेत् ।**

**अहिनकुलस्य वैरं प्रसिद्धम् ।**

**पत्त्यश्वारोहरथिकगजस्थेन सह नृपः समराङ्गणं गतः ।**

**मार्दङ्गिकपाणविकमाहूयत उत्सवकाले ।**

वरील वाक्यांतील सामासिक शब्द हे समाहार द्वन्द्व आहेत हें सहज लक्षांत येईल. कारण वरील शब्दसमूहांच्या अर्थाचे समास समाहार द्वन्द्व करावे असा नियम आहे ते शब्दसमूह पुढीलप्रमाणें आहेत.

( १ ) अवयववाचक शब्द, ( २ ) शाश्वत वैर असणारे प्राणी, ( ३ ) सैन्याचे विभाग व ( ४ ) वाद्य वाजवणारे.

३ **पितापुत्रौ ( पिता च पुत्रः च ) ग्रामं गतौ ।**

***मातापितरौ (माता च पिता च)प्रणिपत्य चन्द्रापीडः प्रस्थितः ।**

**होतापोतारौ ( होता च पोता च ) यज्ञे मन्त्रान्पठतः ।**

* मातापितरौ याबद्दल आणखी मातरपितरौ व पितरौ अशीं रूपेंहि योजता येतात

शरीरसंबंध व विद्यासंबंध दर्शक ऋकारान्त शब्दांचा द्वन्द्व समास केला असतां शेवटच्या शब्दाशिवाय पूर्वीच्या ऋकारान्त शब्दांचें रूप आकारान्त करावें. त्याचप्रमाणे 'पुत्र' हा द्वितीय शब्द असेल तर पहिल्या ऋकारान्त शब्दाचें आकारान्त रूप होतें.

४ जगतः पितरौ वन्दे पार्वतीपरमेश्वरौ ।
कृष्णः सुभद्रा च भ्रातरौ ।
स्नुषा श्वशुरौ आपृच्छ्य पितृगृहं गच्छेत् ।

वरील वाक्यांत पितरौ, भ्रातरौ व श्वशुरौ यांचा अनुक्रमें माता च पिता च, भ्राता च स्वसा च, श्वशुरः च श्वश्रूः च, असा विग्रह होईल. या दोन शब्दां-बद्दल समास करतांना पुल्लिंगी शब्दच फक्त द्विवचनांत योजतात. यांना एकशेष द्वन्द्व असें म्हणतात.

टीप -- रामलक्ष्मणभरतशत्रुघ्नाः । ब्राह्मणक्षत्रियविट्शूद्राः । धर्मभीमार्जुनाः । नकुल-सहदेवौ । या समासांतील पदांचा क्रम बदलतां कामा नये; कारण तो ठरलेला आहे.

हरिहरगुरवः । अश्वरथेन्द्राः किंवा इन्द्राश्वरथाः ।

कमी अवयवांचा शब्द व अन्त्य इ किंवा उ असणारा शब्द पूर्वी ठेवावा व इतर शब्द वाटेल तसे जोडावे. त्याचप्रमाणें स्वरादि व स्वरान्त शब्द पहिल्यानें योजावे.

## कांहीं महत्त्वाचे अनियमित द्वन्द्व समास

अहः च रात्रिः च – अहोरात्रः । वाक् च मनः च – वाङ्मनसे । जाया च पतिः च – जायापती – जम्पती – दम्पती । नक्त च दिवा च – नक्तंदिवम् । अहनि च निशायां च – अहर्निशम् । अहनि च दिवा च – अहर्दिवम् । रात्रौ च दिवा च – रात्रिंदिवम् । उदितास्तङ्गतौ ( चन्द्रसूर्यौ ) । कृष्णारुणौ ( भीष्मार्जुनौ ) । शीतोष्णे ( जले ) । उत्तमाधममध्यमाः ( पुरुषाः ) ।

वाक् च त्वक् च एतयोः समाहारः –वाक्त्वचम् । छत्रं च उपानहौ च एतेषां समाहारः – छत्रोपानहम् । शमी च दृषद् च एतयोः समाहारः –शमीदृषदम् ।

समाहार द्वन्द्वाच्या अन्त्य शब्दाचे शेवटी जर च वर्गांचें व्यंजन, द्, ष्, किंवा ह् हे वर्ण असतील तर समासाला अ जोडतात व वनप्रमाणे चालवतात.

## अव्ययीभाव

प्रतिदिनम्, उपरामम् व यथाविधि हे समास अव्ययीभाव आहेत हें विग्रहासहित दुसऱ्या पुस्तकांत सांगितलेलेंच आहे.

५ अनुगङ्गं तिष्ठति वाराणसी। (गङ्गाम् अन्वायतम्)

अनुविष्णुस्सुरा व्रजन्ति। (विष्णोः पश्चात्)

अनुरूपं व्यवहरन्ति जनाः। (रूपस्य योग्यम्)

अनुदिनं क्षीयते चन्द्रः। (दिने दिने)

अनुक्रमं पारितोषिकाणि दीयन्ताम् (क्रममनुसृत्य)

अनु हें अव्यय प्रथम पद योजून निरनिराळ्या अर्थाचे वर दर्शविल्याप्रमाणें अव्ययीभाव समास करतां येतात.

६ यावदवकाशं बालः पाठान्पठति। (यावान् अवकाशः तावान्)

बहिर्वनं तिष्ठत्याश्रमः। (वनाद्बहिः).

आमूलं–आमूलात् कथां श्रोतुमिच्छामि। (मूलात् आ)

पारेगङ्गं यात्रिका गताः। (गङ्गायाः पारे)

मध्येगङ्गं तरन्ति नौकाः (गङ्गायाः मध्ये)

अभ्यग्नि प्रत्यग्नि वा शलभा डयन्ते। (अग्निम् अभि-प्रति)

सतृणं स नरो देशान्तरं गतः। (तृणम् अपि अपरित्यज्य)

प्रत्यक्षम्–अपरोक्षम्–परोक्षम्–समक्षम् वा न कमपि निन्देन्नरः।

(अक्षिणी प्रति, अक्ष्णोः अपरम्, अक्ष्णोः परम्, अक्ष्णोः समीपे)

वरील वाक्यांत नेहमीं येणाऱ्या निरनिराळ्या तऱ्हेच्या अव्ययीभाव समासांचीं विग्रहांसह उदाहरणें दिलीं आहेत. वरील सर्व समासांवरून हें लक्षांत येईल कीं अव्ययीभाव समासाचें रूप नपुं. एकवचनी रूपाप्रमाणें असतें. तसें करतांना अन्त्य पदांत पुढीलप्रमाणें फरक होतात.

१ उपशालम्–उपगु ( अन्त्य दीर्घ स्वर ह्रस्व होतो, ए–ऐ चा इ होतो व ओ–औ चा उ होतो. ) २ उपराजम्–उपवर्त्म–उपवर्त्मम् ( पुं. व स्त्री. नामांच्या अन्त्य 'न्' चा लोप होतो व नपुं. नामांच्या अन्त्य 'न्' चा लोप विकल्पानें होतो ). ३. उपनदम्–नदि, अधिगिरम्–गिरि ( नदी व गिरि यांच्या अन्त्य इ–ई बद्दल विकल्पानें अम् येतो ). ४ उपवणिजम्–उपवणिक् ( पहिल्या चार वर्गव्यंजनांपैकीं एकादें व्यंजन अन्त्य पदाचे शेवटीं असल्यास त्याला अ विकल्पानें जोडतात ).

## नवीन शब्द

अहिः ( पुं. )–साप
दंष्ट्रा ( स्त्री. )–दांत, दाढ
नकुलः ( पुं. ) –मुंगूस
पत्तिः ( पुं. )–पायदळांतील शिपाई
पाणविकः ( पुं. )–पणव नांवाचें वाद्य वाजविणारा
पोतृ ( पुं. )–यज्ञांतील पुरोहित
मार्दङ्गिकः ( पुं. )–मृदंग वाजविणारा
व्यालः ( पुं. )–सर्प
शमी ( स्त्री. )–एक वृक्ष
होतृ ( पुं. )–यज्ञांतील पुरोहित

---

## प्रश्न

१ पुढील समासांचा विग्रह करा व नांवें सांगाः—

यावच्छ्लोकम् । अनुयमुनम् । कामक्रोधलोभाः । जयाजयौ । व्यालमूषकम् । अजव्याघ्रम् । दंष्ट्रानखलाङ्गूलम् । अधिराज्यम् । अभिसूर्यम् । यथाकामम् । आकैलासम् ।

२ पुढील शब्दसमुच्चयांबद्दल संस्कृत समास योजाः—

१ साम, दाम, दण्ड, व भेद; २ पर्वतावर; ३ आकाशापर्यंत; ४ राम, सीता व लक्ष्मण; ५ योग्यतेला अनुसरून; ६ पर्वत, नद्या, सरोवरें, वृक्ष ( ही सर्व ); ७ देशादेशांत; ८ मांजर व उंदीर; ९ डोळे, कान व तोंड; १० डोळ्यांसमोर.

३ द्वन्द्व व अव्ययीभाव यांची लक्षणें काय आहेत हें सोदाहरण लिहा.

---

# पाठ १०

## समास—तत्पुरुष



वसिष्ठाज्ञा, यज्ञरक्षणम्, यज्ञकुण्डम्, अग्निज्वालाः वगैरे समास षष्ठी तत्पुरुष आहेत हें दुसऱ्या पुस्तकांत सांगितलेलें आहे. विग्रहामध्यें प्रथम पदाची जी विभक्ति योजावी लागते त्या विभक्तीचा तत्पुरुष समास होतो हेंहि पूर्वी सांगितलेलें आहे

१ (अ) पञ्जरगतः शुकः स्वातन्त्र्याय स्पृहयति। कृष्णाश्रितेन पार्थेन कौरवाः पराजिताः। दुःखप्राप्तो नरो धैर्यं त्यजति। प्रायः सुखापन्नो नर ईश्वरं विस्मरति। दुःखातीतो नरो सुखेन जीवति। नरकपतितो नरो दुर्गतिं गच्छति।

(आ) मुहूर्तसुखमनुभवति नरोऽर्थेन। मासभोग्य उपवासोऽसह्यो भवति। क्षणदृष्टा विद्युच्चक्षुषोस्तेजः प्रतिहन्ति।

वरील अ व आ मधील अधोरेखित समासाचा विग्रह करतांना प्रथम पद द्वितीयेंत योजावें लागतें, म्हणून हे **द्वितीया तत्पुरुष** होत.

(१) श्रित, अतीत, गत, प्राप्त व आपन्न या द्वितीय पदांचा द्वितीयान्त प्रथमपदाशीं समास होतो. प्राप्त व आपन्न हे समासांत प्रथमपद किंवा द्वितीयपद म्हणूनहि योजले जातात. जसें—दुःखप्राप्तः-प्राप्तदुःखः।

(२) कालवाचक प्रथम पद द्वितीयान्त असून क्रियावाचक द्वितीयपदाशीं त्याचा द्वितीया तत्पुरुष समास होतो.

टीप—गमी, बुभुक्षु व अत्यस्त याचाहि द्वितीयान्त प्रथम पदाशी द्वि. तत्पुरुष समास होतो.

२ (अ) विष्णुत्रातो भक्तो धन्यः। दुर्योधनस्योरुर्गदाभिन्न आसीत्। योधानां शरीरे शस्त्रव्रणा दृश्यन्ते। नरः परिश्रमार्थेन जीवेत्।

(आ) मातृसदृशो-समो ह्यालोऽयं दृश्यते। एकोना विंशती रूपकाणां तेन मह्यं दत्ता। वर्षपूर्वोऽयं वृत्तान्तः। वाक्कलहो वैराय कल्पते। शर्करामिश्रमन्नं रोचते बालेभ्यः। एकाधिकं भागं ज्येष्ठो लभेत।

(इ) दध्यन्नं गृहीत्वा पान्थः प्रस्थितः। गुडधाना बाला भक्षयन्ति।

वरील अ, आ, व इ यामधील अधोरेखित समासांच्या विग्रहांत प्रथम पद तृतीयेंत योजावें लागतें व समासांतच अर्थ पूर्ण होतो. म्हणून हे तृतीया तत्पुरुष होत.

( १ ) कर्मणि भूत. धातु. विशेषणाचा कर्तृपदाशी किंवा साधनपदांशी तृतीया तत्पुरुष समास होतो. त्याचप्रमाणें क्रियेचा परिणामवाचक शब्द साधनवाचक तृतीयान्त पदाशी जोडला जातो व तोहि तृ. तत्पुरुष होतो.

( २ ) सम-सदृश, ऊन, पूर्व, कलह, मिश्र व अधिक या शब्दांचा तृतीयान्त प्रथमपदाशीं तृ. तत्पुरुष समास होतो. मात्रा सदृशः, एकेन ऊना, मासेन पूर्वः इ०.

( ३ ) अन्नवाचक शब्दाचा रुचिवर्धक पदार्थवाचक शब्दाशीं तृतीया तत्पुरुष समास होतो. दध्ना अन्नम्, गुडेन धानाः इ.

टीपः—निपुण, श्लक्ष्ण व अवर याचाहि तृतीयान्त प्रथमपदाशी तृ. त. समास होतो

३ (अ) कुण्डलहिरण्यं क्रीयते नरेण। घटमृद् सङ्क्रीयते कुम्भकारेण।

(आ) सुखार्थः प्रयत्नो नैसर्गिकः। वृत्त्यर्था विद्या रोचते नराय सामान्यतः। मोक्षार्थं ज्ञानमन्विष्यते यतिभिः।

(इ) देवबलिर्दीयते गृहस्थेन। काकबलिर्दीयेत प्रतिदिनं नरेण।

वरील अ, आ व इ मधील अधोरेखित समासांतील द्वितीयपदाचा चतुर्थ्यन्त प्रथमपदाशीं समास झालेला आहे हे चतुर्थी तत्पुरुष समास होत.

(१) एखाद्या पदार्थवाचक शब्दाचा ज्याच्याकरितां तो पदार्थ उपयोगांत आणावयाचा त्या अर्थाच्या चतुर्थ्यन्त पदाशीं चतुर्थी तत्पुरुष समास होतो. कुण्डलाय हिरण्यम्, घटाय मृद् इ.

(२) 'करितां' या अर्थी येणाऱ्या 'अर्थ' शब्दाचा 'ज्याच्याकरितां' या अर्थाच्या चतुर्थ्यन्त पदाशीं चतुर्थी तत्पुरुष समास होतो, व तो विशेषण असतो. सुखाय अयम्, वृत्तये इयम्, मोक्षाय इदम् इ.

(३) 'बलि' या शब्दाचा चतुर्थ्यन्त प्रथमपदाशी चतुर्थी तत्पुरुष समास होतो. भूतेभ्यः बलिः, काकेभ्यः बलिः इ.

**टीप** —ज्या समासाचे शेवटीं 'अर्थ' आहे त्याचें द्वितीया एकवचनी रूप अव्ययासारखें योजतात. सुखार्थं यतते नरः । बालो ज्ञानार्थं पाठशालामागच्छति । सुख, रक्षित व हित ही विशेषणें असतांना याचा चतुर्थ्यन्त नामाशी समास होतो.

**४ (अ) मृत्युभयं प्राणिनां वर्तते। व्याघ्रभीतः पान्थस्तस्य समीपं न गच्छति।**

**(आ) सुखापेतो नरो निर्विण्णो भवति। स्वर्गपतितो गन्धर्वो भूतले मनुजरूपेण जातः। धनुर्मुक्तो बाणः प्रतिसंहर्तुमशक्यः। सव्येतरे पाणौ धनुर्धृत्वा ज्यामाकर्षति दक्षिणहस्तेन वीरः।**

वरील वाक्यांतील समासांच्या द्वितीय पदांचा प्रथमपदाच्या पञ्चम्यन्त रूपांबरोबर समास केलेला आहे. यांना **पंचमी तत्पुरुष** म्हणतात.

(१) भीति, भय या अर्थाच्या शब्दांचा ज्याच्यापासून भीति उत्पन्न होते त्या अर्थाच्या शब्दांच्या पंचम्यन्त रूपांबरोबर समास केला जातो. मृत्योः भयम् । व्याघ्रात् भीतः ।

(२) अपेत, पतित, मुक्त व इतर यांचा पंचम्यन्त प्रथम पदांबरोबर समास होतो. सुखात् अपेतः । स्वर्गात् पतितः । धनुषः मुक्तः । सव्यात् इतरः ।

**टीपः**—अपोढ, अपत्रस्त यांचाहि पंचम्यन्त नामांबरोबर पं. तत्पु. समास होतो.

**५ (अ) मासजातो बालो रोदिति। संवत्सरमृतोऽपि पिता स्मर्यते बालेन।**

(आ) अर्धमासं रोगेण पीडितं मे मित्रम् । मृगः पूर्वकाये वाणेन विद्धः ।

(इ) देवपूजको ब्राह्मणः पुण्यवान्भवति । भूभर्ता प्रशस्यते प्रजाभिः ।

वरील वाक्यांत **षष्ठी तत्पुरुष** समास योजलेले आहेत.

**अ व आ** मध्यें समासरचना नेहमींहून निराळी आहे. षष्ठ्यन्त पदाचा प्रथमान्त प्रथमपदाशी समास झाला आहे. मासः जातस्य (अस्य) । संवत्सरः मृतस्य (अस्य)। अर्धं मासस्य । पूर्वं कायस्य ।

इ मध्यें 'अक व तृ' प्रत्ययान्त कर्तृवाचक धातुसाधित नामांचा कर्मवाचक शब्दावरोवर षष्ठी तत्पु. समास झाला आहे. देवानां पूजकः । भुवः भर्ता ।

**टीपः**—सामान्यतः 'तृ व अक' प्रत्ययान्त शब्दांचा कर्मवाचक शब्दाशीं षष्ठी तत्पुरुष समास होत नाही. परंतु पूजक, परिचारक, अध्यापक, भर्तृ (रक्षण करणारा) यांचा समास होतो.

६ (अ) द्यूतशौण्डः-प्रवीणः शकुनिरासीत् ।
नृपश्रेष्ठो रामः पृथ्वीं नयेन शशास ।
नृत्यकुशला अप्सरस इन्द्रं प्रीणयन्ति ।

(आ) कालकृता कृषिः फलवती भवति ।
सिंहासनस्थितो नृपो बन्दिभिर्वर्ण्यते ।
वृक्षपक्वानि फलानि सरसानि सन्ति ।

वरील वाक्यांतील समासांत द्वितीय पदाचा संबंध सप्तम्यन्त प्रथमपदाशीं दर्शविला जातो, यांना **सप्तमी तत्पुरुष** असें म्हणतात.

(१) शौण्ड, प्रवीण, कुशल व श्रेष्ठ व याच अर्थाचे इतर शब्द यांचा सप्तम्यन्त नामांवरोबर समास होतो.

(२) अधिकरणवाचक स्थलार्थी व कालार्थी सप्तम्यन्त पदाचा क्रियावाचक द्वितीयपदाशीं समास होतो.

७ अमित्रः परिहर्तव्यो जनैः । अनुद्योगेन कार्यसिद्धिर्न भवति ।
असुराणां वधाय रामो जातः । अचिरादागतं मित्रं मया दृष्टम् ।

वरील समासाचे प्रथम पद ‘ अ ’ किंवा अन् ’ हें नकार दर्शवितें. अशा समासाना नञ् तत्पुरुष समास म्हणतात; कारण या समासाचा अर्थ पूर्ण आहे. व्यजनारंभी शब्दापूर्वी ‘ अ ’ जोडतात व स्वरारंभी शब्दापूर्वी ‘ अन् ’ जोडतात.

टीप —क्वचित् ठिकाणी ‘ न ’ असाच आगम येतो. जसें—नक्षत्रम्, नाक, नकुलम् ।

८ वृक्षस्थं फलं भक्षयन्ति शुकाः । शस्त्रभृतो हन्यन्ते युद्धे शत्रुभिः ।
पितरौ पुत्रस्य पूजार्हौ । सुखभाजो नरो मनःस्वास्थ्यं लभन्ते ।
देहजो व्याधिरौषधेन दूरीक्रियते । पयोदा उन्नता भवन्ति ।
पुण्यकृतः सुखं लभन्ते । शेषशायी विष्णुः क्षीरसागरे वर्तते ।

वरील वाक्यांतील अधोरेखित समासाचा अन्त्यावयव हा क्रियापदापासून झालेला आहे; परंतु तो स्वतंत्र रीतीनें उपयोगात आणतां येत नाहीं. अशा तऱ्हेच्या समासांना उपपद तत्पुरुष समास म्हणतात.

वृक्षे तिष्ठति । शस्त्रं बिभर्ति । पूजाम् अर्हति । सुखं भजति । देहात् जायते । पयः ददाति । पुण्यं करोति । शेषे शेते ।

टीप.—जलधर –जलस्य धरः, शिरोधरा–शिरस धरा, याना षष्ठी तत्पुरुष म्हणतात. मधुसूदन (मधो सूदन किंवा मधुं सूदयते ) व हुताशन (हुतम् अश्नाति किंवा हुतम् अशन यस्य स ) हे दोन्हीं प्रकारानी सोडविले जातात. त्याचप्रमाणें वृक्षस्थ (उप.) व वृक्षस्थित ( सप्तमी तत्पुरुष ) यातील फरक लक्षात ठेवावा.

९ कृष्णसखोऽर्जुनो रणक्षेत्रे विषण्णो जातः । ( कृष्णस्य सखा )
निषधराजो नलो दमयन्तीं परिणिनाय । ( निषधाना राजा )
सप्ताहस्य पञ्चकृत्वो वयं संस्कृतं पठामः । (सप्तानाम् अह्नाम् समाहारः)
पूर्वाह्णे नर आपराह्णिकं कार्यं कुर्वीत ( पूर्वम् अह्नः )
मध्याह्ने सूर्यस्यातपोऽसह्यो भवति । ( मध्यम् अह्नः )

विस्तीर्णे राजपथे विविधानि वाहनानि चलन्ति । (राज्ञः पन्थाः)

त्रिपथेन गच्छन्ती गङ्गा त्रिपथगेत्युच्यते । ( त्रयाणां पथां समाहारः )

यतिरेकस्थाने त्रिरात्रं न वसेत् । ( तिसृणां रात्रीणां समाहारः )

मध्यरात्रे चोरा इतस्ततः सञ्चरन्ति । ( मध्यं रात्रेः )

वरील वाक्यांतील समास व त्यांचे विग्रह यांवरून पुढील गोष्टी ध्यानांत येतील. ( १ ) सखि, राजन्, पथिन्, अहन् व रात्रि हे शब्द तत्पुरुष किंवा कर्मधारय किंवा द्विगु समासांचे शेवटीं सख, राज, पथ, अह-अह्न, व रात्र असे अकारान्त होतात. ( २ ) त्यांतील 'अहन्' हा सर्व, भागवाचक शब्द व अव्यय यांपैकी प्रथम पद असतांना 'अह्न' असा होतो व पुल्लिंगी असतो परंतु संख्यावाचक शब्द किंवा उत्तम हे प्रथम पद असताना 'अह' होतो व पुल्लिंगीच असतो. ( ३ ) 'रात्रि' शब्दाचे रुप संख्यावाचक शब्दानंतर 'रात्रम्' असें नपुं. होतें व भागवाचक शब्द, अव्यय किंवा सर्व हे प्रथम पद असताना रात्रः असें पुल्लिंगी रूप होतें. ( ४ ) सखि, राजन् व पथिन् हे सामान्यतः सखः, राजः व पथः असे पुल्लिंगीच राहतात

राज्यस्य धूः—राज्यधुरा। परंतु रथस्य धूः—रथधूः। 'धुर्' शब्दाचें रूप तत्पुरुष समासाचे शेवटी 'जबाबदारी' या अर्थी 'धुरा' असें होतें; जोखड या अर्थी बदलत नाही

१० प्रवाते निषण्णो जन उत्साहवान्भवति । ( प्रकृष्टः वातः )

अधिराजः सामन्तानाज्ञापयति । ( अधिकः राजा )

अपमार्गेण गच्छन्नरो दुःखभाग्भवति । ( अपकृष्टः मार्गः )

वरील वाक्यांतील समासहि तत्पुरुष असून त्यांचे पहिलें पद उपपद आहे; म्हणून यांना प्रादि तत्पुरुष म्हणतात.

वरील प्रकारचे काही समासः—प्राचार्यः—प्रगतः आचार्यः ! अतिशयितः वेगः—अतिवेगः। निर्गतः वनात्—निर्वनः। अतिक्रान्तः इन्द्रियाणि—अतीन्द्रियः ।

## नवीन शब्द

अत्यस्त ( क. भू. धा. वि. )—पलीकडे फेकलेला
अपोढ ( क. भू. धा. वि. )—दूर नेलेला
ऊरुः ( पु. )—मांडी
गुडः ( पु. )—गूळ
धानाः ( स्त्री. बहुवचन )—लाह्या
प्रति + सम् + हृ ( १ उ. )—मागें घेणें, आवरणें
वृत्तिः ( स्त्री. )—उपजीविका
शौण्ड ( वि. )—प्रवीण
श्लक्ष्ण ( वि. )—सभ्य, शांत
सव्य ( वि. )—डावा

---

### प्रश्न

१ पुढील समास सोडवून त्यांचीं नांवें द्याः—

आपद्गतः, खड्गहतः, शक्तिविद्धः, शर्करौदनः, कर्णसमः, दण्डकलहः, कलानिपुणः, वृक्षपक्वम्, अलङ्कारसुवर्णम्, सुवर्णालङ्कारः, ज्ञानार्थम्, दक्षिणेतरः, वर्षद्वयजातः, मासनिर्गतः, शयनस्थितः, अनुदारः, शस्त्रभृतः, पापकृतः, शस्त्रास्त्रकोविदः, बाणौघः ।

२ पुढील शब्दांचे समास करून नांवें सांगा :—

स्वर्ग+पथिन्, चतुर्+रात्रि, त्रि+अहन्, अपर+अहन्, वङ्ग+राजन्, वीर+सखि, क्लेश+आपन्न, पूर्व+रात्रि.

३ तत्पुरुषाचें मुख्य लक्षण सांगून त्याचे निरनिराळे प्रकार सोदाहरण सांगा.

---

# पाठ ११

## कर्मधारय



**गम्भीरनादः, नीलकमलम्, घोरदर्शनम्** या समासांचा अर्थ पूर्ण आहे व प्रथम पदें विशेषणें असून द्वितीय पदें विशेष्यें आहेत. म्हणून हे **कर्मधारय** आहेत हें दुसऱ्या पुस्तकांत सांगितलेलेंच आहे. या कर्मधारयाच्या प्रकाराला **विशेषणविशेष्य कर्मधारय** असें म्हणतात.

१ इन्दुधवलेन हारेण राजपुत्रः शोभते। ( इन्दुः इव धवलः )
विद्युच्चञ्चला लक्ष्मीश्चिरं नाश्रयते नरम्। ( विद्युत् इव चञ्चला )
मेघश्यामो विष्णुर्भक्तान्रक्षति। ( मेघः इव श्यामः )

वरील समासांच्या विग्रहावरून हें ध्यानांत येईल कीं या समासांत ( १ ) दोन्ही पदें प्रथमा विभक्तींत आहेत, ( २ ) प्रथम पद उपमानवाचक ( ज्याची उपमा द्यावयाची तें ) आहे आणि ( ३ ) द्वितीय पद साधर्म्यवाचक आहे व समासांचा अर्थ पूर्ण आहे., तुलनादर्शक 'इव' हा शब्द उपमानानंतर योजलेला आहे. यांना **उपमानपूर्वपद कर्मधारय** असें म्हणतात.

२ बालस्य मुखकमलं जननीमानन्दयति। ( मुखं कमलम् इव )
पुरुषव्याघ्रं लक्ष्मीराश्रयति। ( पुरुषः व्याघ्रः इव )
विष्णोश्चरणकमलं भक्ताः पूजयन्ति। ( चरणः कमलम् इव )

वरील समासांच्या विग्रहावरून हें ध्यानांत येईल कीं ( १ ) समासांचा अर्थ तुलनात्मक असून पूर्ण आहे, ( २ ) प्रथमपदें उपमेये ( ज्यांना उपमा द्यावयाची तीं ) व द्वितीयपदे उपमानें आहेत आणि ( ३ ) विग्रहांत दोन्ही पदें प्रथमा विभक्तीतच आहेत. उपमादर्शक 'इव' हा शब्द उपमानानंतर विग्रहांत योजलेला आहे. यांना उ [illegible] किंवा **उपमानोत्तरपद कर्मधारय** असें म्हणतात.

वरील समासांचा विग्रह दोन्ही पदांमध्यें ‘ एव ’ घालूनहि करतां येतो, परंतु द्वितीय पदाला प्राधान्य देऊन उपमेय व उपमान यांचें तादूप्य झालें पाहिजे. जसें---मुखकमलं प्रफुल्लं भवति। यांत मुखम् एव कमलम् असा विग्रह केला पाहिजे. कारण प्रफुल्ल होणें ही क्रिया कमळाला अनुलक्षून आहे; म्हणून उपमेयोपमान समासांतील उपमेयाला प्राधान्य दिलें असेल त्यावेळीं उपमानानंतर ‘ इव ’ योजून विग्रह करावा व ज्या वेळीं उपमानाला प्राधान्य दिलेलें असेल त्या वेळीं उपमेय व उपमान यांमध्यें ‘ एव ’ हा शब्द योजून विग्रह करावा.

टीप—इन्द्र, व्याघ्र, पुङ्गव, ऋषभ, कुञ्जर, सिंह, शार्दूल, नाग हे शब्द कर्मधारयाच्या शेवटी उपयोगांत येतात व त्याचा अर्थ ‘ उत्तम-श्रेष्ठ ’ असा असतो. परंतु त्यांचा विग्रह सप्तमीतत्पुरुषाप्रमाणें न करतां कर्मधारयाप्रमाणें केला पाहिजे.

३ कृष्णसारङ्गं मृगं विव्याध बाणैर्लुब्धकः। (कृष्णः च सारङ्गः च)
शूरोदारो नरः सर्वदाऽऽद्रियते जनैः। (शूरः च उदारः च)
प्रच्छायशीतले तरुतले पान्था विश्राम्यन्ति।
(प्रच्छायं च अतः एव शीतलम्)

वरील वाक्यांतील समास दोन दोन विशेषणें एके ठिकाणीं जोडून केलेले आहेत. मात्र हीं विशेषणें एकाच नामाची आहेत. म्हणून या समासांना कर्मधारयच म्हणतात. परंतु शीतोष्णे (जले) व अस्तोदितौ (चन्द्रसूर्यौ) यांतील विशेषणें निरनिराळ्या दोन नामांचीं आहेत म्हणून हे द्वन्द्व होत.

४ स्नातानुलिप्ताय बटवे दक्षिणां प्रयच्छति धनिकः।
गृहीतप्रतिमुक्तस्य महेन्द्रनाथस्य श्रियं रघुरपजहार।
पीतोद्गीर्णमौषधमनुपयुक्तं भवति।
सुप्तप्रतिबोधितं नृपं द्रष्टुमिच्छति चारः।

स्नातानुलिप्तः—आदौ स्नातः पश्चात् अनुलिप्तः। गृहीतप्रतिमुक्तः—आदौ गृहीतः पश्चात् प्रतिमुक्तः। पीतोद्गीर्णम्—आदौ पीतम् पश्चात् उद्गीर्णम्। सुप्तप्रतिबोधितः—आदौ सुप्तः पश्चात् प्रतिबोधितः।

वरील समासांमध्यें दोन दोन कर्मणि भूत. धातु. वि. आहेत व त्यांतील पहिलें पूर्वी घडलेली क्रिया दर्शवितें व दुसरें नंतर घडलेली क्रिया दर्शवितें. अशा समासांनाहि **कर्मधारय** म्हणतात.

५ प्राज्ञः पृथग्जनवच्छोचितुं नार्हति ।
मिथ्यापवादेन नरस्य मनः कलुषितं भवति ।
कण्वस्यान्तरात्मा शकुन्तलाविवाहेन निश्चिन्तो जातः ।

वरील वाक्यांतील अधोरेखित समासांतील प्रथमपदें अव्ययें असून त्यांचा विशेषणांप्रमाणें उपयोग केलेला आहे. अशा समासांनाहि **कर्मधारय** समास असें म्हणतात. अशा तऱ्हेचे दुसरे समासः–बहिरिन्द्रियम्, वृथाश्रमः ।

टीप —समीपस्थित.–उपरिचिह्न. या समासांचें प्रथम पद अव्ययच आहे; परंतु त्याचा अधिकरणार्थी उपयोग असल्यामुळे व विशेषणासारखा नसल्यामुळें त्यास तत्पुरुष असें म्हणतात.

६ (अ) स किंसखा साधु न शास्ति योऽधिपम् ।
हिताच्च यः संगृणुते स किंप्रभुः ।
कापुरुषः स्वल्पकेनापि तुष्यति ।
कदन्नं भक्षयित्वा नर आमयावी भवति ।
(आ) कुसुमानां सुगन्धमाघ्राय मन उल्लसति ।
सुकृतेनैव नरो जगति सुखं लभते ।
(इ) दुष्कर्मणा नरस्य कीर्तिर्मलिनीभवति ।
दुर्जनः प्रियवादी च नैतद्विश्वासकारणम् ।

वरील 'अ' मधील अधोरेखित समासांत 'कुत्सित' या अर्थी 'कु–का–कद्–किम्' असें नामांच्या पूर्वी आगम जोडलेले आहेत; 'आ' मध्यें 'शोभन–चांगला'-या अर्थी 'सु' जोडलेला आहे व 'इ' मध्यें 'दुष्ट' या अर्थी 'दुस्' जोडलेला आहे. हे समासहि कर्मधारयच होत.

७ त्रिभुवने शूरस्य कीर्तिः प्रसरति। त्रयाणां भुवनानां समाहारः त्रिभुवनम्
त्रिलोक्यां कर्ण इव दाता विरलः । त्रयाणां लोकानां समाहारः त्रिलोकी

पञ्चपात्रे पञ्च वस्तूनि स्थाप्यन्ते। पञ्चानां पात्राणां समाहारः पञ्चपात्रम्
सप्तपद्या अनन्तरं विवाहः पूर्णो भवति। सप्तानां पदानां स० सप्तपदी
पञ्चवट्यां रामो न्यवसत्। पञ्चानां वटानां समाहारः पञ्चवटी

वरील समासांचा अर्थ समुदायवाचक आहे हें विग्रहावरून ध्यानांत येईल. या समासांचें प्रथमपद संख्यावाचक शब्द आहे व समासाचें रूप नपुं. एकवचनी रूपाप्रमाणें किंवा 'ई' जोडून 'नदी' प्रमाणे केलेलें आहे. अशा समासांना 'द्विगु' म्हणतात, हाहि एक कर्मधारयाचा प्रकार आहे.

टीपः—शतवर्षम् हा द्विगु आणि वर्षशतम्–षष्ठी तत्पुरुष. त्रिगुणम्–द्विगु आणि गुण-त्रयम्-ष. त. परंतु एकवीरः आणि वीरैक हे कर्मधारय.

८ कथान्तरं कथयति गुरुः शिष्यैर्निर्बन्धपृष्टः। (अन्या कथा-कथान्तरम्)
ग्रामान्तरादागतो दूतः। (अन्यः ग्रामः–ग्रामान्तरम्)
जन्मान्तरे कृतं कर्म दैवमिति ज्ञायते। (अन्यद् जन्म–जन्मान्तरम्)

वरील समासांतील अन्त्यपद 'अन्तर' हा शब्द 'अन्य' या अर्थी आलेला आहे. कर्मधारयाच्या पद्धतीप्रमाणें तो प्रथमपद म्हणून उपयोगांत आणणें जरूर होतें; परंतु अशा अर्थाच्या समासांत तो शेवटीं येतो व प्रथम पदाचें कोणतेंहि लिंग असलें तरी समासाचें रूप नपुंसकलिंगी अकारान्त नामांप्रमाणे होतें. 'अन्य' हा विग्रहांतील शब्द समासांत बदलत असल्यामुळें याला 'नित्य' समास असेंहि म्हणतात.

टीप.—(१) मयूर. च असौ व्यंसकः च मयूरव्यंसकः। उदक् च अवाक् च उच्चावचम्। नास्ति किञ्चन यस्य स. अकिञ्चनः। नास्ति कुतः भयं यस्यः सः अकुतोभयः। अन्यः राजा राजान्तरम्। चित् एव चिन्मात्रम्। अहम् अहम् इति यस्यां क्रियायाम् अभिधीयते सा अहमहमिका। यांना अनियमित तत्पु. किंवा मयूरव्यंसकादि म्हणतात.

(२) शाकप्रिय पार्थिव—शाकपार्थिवः। देवपूजकः ब्राह्मण—देवब्राह्मणः। छायाप्रधानः तरुः—छायातरु. यांना मध्यमपदलोपी समास म्हणतात. हे कर्मधारयच आहेत.

(३) युधिष्ठिर., जनुषान्धः, आत्मनातृतीयः, परस्मैपदम्, देवानांप्रियः (मूर्ख), पश्यतोहर. (सोनार), वाचस्पति. या समासांतील प्रथम पदाचा विभक्ति प्रत्यय समासांतहि कायम राहिला आहे. अशा तत्पुरुष समासांना अलुक् म्हणतात.

## नवीन शब्द

अगारम् ( न. )–घर
अनुलिप्त ( क. भू. धा. वि. )–उटी लावलेला
उद्गीर्ण ( क. भू. धा. वि. )–बाहेर टाकलेलें, ओतलेलें
ऋषभः ( पुं. )–बैल
कृतक ( वि. )–मानलेला, दत्तक
नागः ( पुं. )–हत्ती
पताका ( स्त्री. )–निशाण
स्तबकः ( पुं. )–फुलांचा झुबका
पिङ्गलः ( वि. )–पिंगट
पुङ्गवः ( पुं. )–बैल
पृथग्जनः ( पुं. )–सामान्य मनुष्य
शार्दूलः ( पुं. )–वाघ

---

### प्रश्न

१ पुढील समासांचा विग्रह करा व नांवें सांगा :—

घनश्यामः, बाहुदण्डः, भक्तिनौका, दुग्धधवलः, कर्णोदारः, प्रसन्नप्रशान्तः, दत्तप्रतिगृहीतम्, बद्धमुक्तः, चतुःसूत्री, दुर्वचनम्, कथान्तराणि.

२ पुढील शब्दसमुच्चयांबद्दल संस्कृत समास योजाः—

हरिणासारखा चपळ, काळे व पिंगट ( डोळे ), आशारूपी नदी, मेघाप्रमाणें क्षणिक, कठोर शब्द, जाऊन परत आलेली, शोकरूपी समुद्र, वीजरूपी निशाणें, माजलेले हत्ती, आवडता मित्र.

३ पुढील श्लोकांतील जाड अक्षरांतील समासांचे विग्रह करून नांवें सांगाः—

**श्रुताध्ययनसम्पन्ना धर्मज्ञाः सत्यवादिनः** ।
राज्ञा **सभासदः** कार्या रिपौ मित्रे च ये समाः ॥
आरुह्य **कविताशाखां** वन्दे **वाल्मीकिकोकिलम्** ।
तत्रागारं **धनपतिगृहानुत्तरेणास्मदीयम्** ।
दूराल्लक्ष्यं **सुरपतिधनुश्चारुणा** तोरणेन ॥
यस्योपान्ते **कृतकतनयः** कान्तया वर्धितो मे ।
**हस्तप्राप्यस्तवकनमितो बालमन्दारवृक्षः** ॥

---

# पाठ १२

## बहुव्रीहि



गम्भीरनादः ( मेघः ), घोरदर्शनः ( निशाचरः ) व धवलप्रकाशः ( चन्द्रः ) ही उदाहरणें षष्ठी बहुव्रीहि समासाचीं आहेत हें सविस्तर रीतीनें दुसऱ्या पुस्तकांत दाखविलेलें आहे.

१ प्राप्तोदके क्षेत्रे विपुलं सस्यं रोहति । ( प्राप्तम् उदकं यद् तद् )
कृतप्रतिज्ञोऽर्जुनो जयद्रथमहन् । ( कृता प्रतिज्ञा येन सः )
दत्तपारितोषिको बालः सर्वैरभिनन्दितः । ( दत्तं पारितोषिकं यस्मै सः )
निर्गतारिर्देशः समृद्धो भवति । ( निर्गतः अरिः यस्मात् सः )
*महात्मा गौतमो बौद्धधर्मं प्रसारयत् ।( महान् आत्मा यस्य सः )
निहितविश्वासः सुहृत्सहायो भवति । (निहितः विश्वासः यस्मिन् सः)

वरील बहुव्रीहि समासांच्या विग्रहावरून ते द्वितीया ते सप्तमी बहुव्रीहि आहेत हें लक्षांत येईल. हीं नांवें विग्रहांतील ' यद् ' या सर्वनामाच्या रूपांवरून दिलेलीं आहेत. बहुव्रीहि समास हे विशेषणात्मक असल्यामुळें ज्या नामांचीं तें विशेषणें असतील त्यांच्याप्रमाणे त्यांचें रूप लिंग, विभक्ति व वचन यांमध्यें होतें. म्हणून ' कृतप्रतिज्ञः ' या समासांतील द्वितीय पद ' प्रतिज्ञा ' याचें अकारान्त रूप केलें आहे; कारण तो समास ' अर्जुन ' या पुल्लिंगी नामाचें विशेषण आहे.

वरील समासांतील पदें विग्रहामध्यें प्रथमा विभक्तीमध्यें येतात; म्हणून यांना समानाधिकरण बहुव्रीहि असेंहि म्हणण्यांत येतें.

२ भालचन्द्रं शशिमौलिं वा शङ्करं वयं पूजयामः ।
( भाले चन्द्रः यस्य सः ) ( शशी मौलौ यस्य सः )
चक्रपाणिर्विष्णुरस्मान्पातु ( चक्रं पाणौ यस्य सः )

---

*टीपः—' महत् ' या शब्दाचें कर्मधारय व बहुव्रीहि समासांत 'महा' असें रूपान्तर होतें.

वरील समास षष्ठी बहु. आहेत हें विग्रहांवरून ध्यानांत येईल, परंतु यांतील पदें विग्रहामध्यें निरनिराळ्या विभक्तींत आहेत; म्हणून यांस **व्यधिकरण** बहुव्रीहि असेंहि म्हणण्यांत येतें.

३ भीष्मप्रतिज्ञो नरो न कदापि वचनभङ्गं करोति। (भीष्मस्य इव प्रतिज्ञा यस्य सः)

कमललोचनो बालो मातरमानन्दयति। (कमले इव लोचने यस्य सः)

हरिणलोचनोर्वशी पुरूरवसा रक्षिता। (हरिणस्य इव लोचने यस्याः सा)

वरील समासहि बहु. आहेत हें अर्थावरून व विग्रहांवरून ध्यानांत येईल. परंतु त्यांतील प्रथम पद उपमानवाचक आहे. यांना **उपमा बहु.** म्हणतां येईल.

टीपः—कमलाननः (कमलम् इव आननं यस्य सः—बहु.) व मुखकमलम् (मुखम् कमलम् इव किंवा मुखम् एव कमलम्—कर्म.) यांतील फरक लक्षांत ठेवावा.

४ परमेश्वरोऽनादिरनन्तश्च। (न विद्यते आदिः यस्य) (न विद्यते अन्तः यस्य)

अज्ञानोऽनुद्योगश्च नरो जनैस्तिरस्क्रियते। (न विद्यते ज्ञानं यस्य) (न विद्यते उद्योगः यस्य)

वरील वाक्यांत **नञ् बहुव्रीहि** समास योजलेले आहेत, हें अर्थावरून व विग्रहावरून ध्यानांत येईल. शब्दापूर्वी 'अ' किंवा 'अन्' जोडण्यासंबंधीं नियम नञ् तत्पुरुषाप्रमाणेंच आहेत.

५ सहपुत्रः—सपुत्रो नरः। (पुत्रेण सहितः सपुत्रः—सहपुत्रः)

सकामो भक्तः। (कामेन सह सकामः)। सदारः पुरुषः (दारैः सह सदारः)

सानन्दश्छात्रः। (आनन्देन सह सानन्दः)

वरील समासांस **सहबहुव्रीहि** समास म्हणतात. मुख्य नामवाचक द्वितीय पदापूर्वी 'सह' या अर्थी बहुधा 'स' व क्वचित् 'सह' जोडून समास तयार करतात. इतर बहु. समासांच्या विग्रहांप्रमाणें यांच्या विग्रहांत 'यद्' या सर्वनामाचें रूप येत नाहीं.

टीपः—'सहबहुव्रीहि' समासाचा उपयोग अव्ययाप्रमाणेंहि केला जातो. जसें—सादरं प्रणमति बालो गुरुम्। (आदरेण सह यथा स्यात् तथा)

६ व्यसुः-परासुः-विगतासुर्नरः। ( विगताः परागताः वा असवः यस्य सः )
उदायुधाः उद्धृतायुधाः वीराः। ( उद्धृतानि आयुधानि यैः ते )
निराशः-निर्गताशो मनुजः। ( निर्गता आशा यस्य—यस्मात् सः )

वरील समासहि बहुव्रीहिच आहेत हें विग्रहावरून ध्यानांत येईल.

यांतील प्रथमपद उपसर्गसहित धातूचें कर्मणि भू. धातु. विशेषण असतें व समास करतांना उपसर्गसहित कर्मणि भू. धा. विशेषणाऐवजीं विकल्पानें नुसता उपसर्गच प्रथम पद म्हणून द्वितीय पदापूर्वी जोडतात. यांना **प्रादि बहुव्रीहि** म्हणतात.

**टीपः**—( १ ) अधनः ( अविद्यमानं धनं यस्य सः नञ् बहु. ) व निर्धनः ( निर्गतं धनं यस्मात् सः—प्रादि बहु. ) यातील फरक लक्षात ठेवावा.

( २ ) प्रादि समासांतील उपसर्गाबद्दल उपसर्गसहित कर्माणि भू. धा. विशेषणहि योजून समास करतां येतो.

**७ ( अ ) उपपञ्चाशा नरा मया दृष्टाः सभास्थाने।**
( पञ्चाशतः समीपे ये सन्ति ते )

**अदूर-आसन्नविंशाः पाठशालाः सन्ति नगरे।**
( विंशतेः आसन्नाः अदूराः वा )

**अधिकसप्ततानि दिनानि पान्थो देशान्तरं गतः।**
( सप्ततेः अधिकानि )

**( आ ) त्रिचतुराणि फलानि भक्षितानि बालेन।**
( त्रीणि चत्वारि वा )

**पञ्चषा नरा मया मार्गं पृष्टाः।** ( पञ्च वा षड् वा )
**द्वित्राण्यहान्यर्हसि मुनिमुपासितुम्।** ( द्वे वा त्रीणि वा )

**( इ ) त्रिदशानां वासराणां मासो भवति।** ( त्रिः आवृत्ताः दश )
**द्विविंशा बालाः पारितोषिकाण्यलभन्त।**
( द्विः आवृत्ता विंशतिः )

वरील वाक्यांत **संख्यावाचक बहुव्रीहि** समास योजलेले आहेत.

'अ' मध्यें 'जवळ जवळ' या अर्थी 'उप, आसन्न व अदूर' आणि 'ज्यास्त' या अर्थी 'अधिक' असे शब्द संख्यावाचकांपूर्वी जोडलेले आहेत व सर्व समासांना अकारान्त बनविलेले आहेत व नंतर ज्या नामांशी त्यांचा संबंध असेल त्याप्रमाणें ते 'देव, वन व माला' याप्रमाणें चालविलेले आहेत. 'द्वि चा द्व', 'त्रि चा त्र,' 'चतुर् चा चतुर,' 'पञ्चन्, सप्तन् ते नवदशन्' यांबद्दल 'न्' चा लोप करून 'पञ्च, सप्त ते नवदश,' 'षष् चा ष', 'विंशति चा विंश,' 'त्रिंशत् ते नवपञ्चाशत्' पर्यंत 'त्' चा लोप करून 'त्रिंश ते नवपञ्चाश,' 'षष्टि चा षष्ट,' 'सप्तति ते नवनति' यांचा 'सप्तत ते नवनवत' असा फरक संख्यावाचक शब्दामध्यें होतो.

'आ' मध्यें तीन—चार, चार—पांच अशा अर्थाचे बहुव्रीहि समास योजलेले आहेत व त्यांच्या अन्त्य संख्यावाचकांमध्यें 'अ' मध्यें सांगितल्याप्रमाणेंच फरक झाले आहेत.

'इ' मध्यें 'दोनदां वीस, तीनदां दहा' अशा अर्थाचे बहुव्रीहि समास योजलेले आहेत व त्यांच्या अन्त्यपदामध्यें वरीलप्रमाणेंच फरक झालेला आहे.

**८ भारतवर्षस्य दक्षिणपूर्वायां-पूर्वस्यां वा दिशि वङ्गोपसागरो वर्तते । पश्चिमोत्तरायाः-पश्चिमोत्तरस्याः दिशोऽधिपतिर्वायुर्भवति ।**

पूर्व, उत्तर, पश्चिम व दक्षिण या दिशांमधील दिशा दर्शविण्याकरितां वरील-प्रमाणें जवळजवळच्या दोन दिशा जोडून समास करतात व तो शब्द विकल्पानें सर्वनामासारखा चालतो.

दक्षिणस्याः पूर्वस्याः च दिशोः अन्तरालम् दिक् दक्षिणपूर्वा ।
पश्चिमस्याः उत्तरस्याः च दिशोः „ „ पश्चिमोत्तरा ।

**९ १ सुप्रजा नरः सुखं विन्दति ।** ( शोभना प्रजा यस्य सः सुप्रजाः )

**२ अल्पमेधसो नरस्य क्रिया विनश्यन्ति ।**
( अल्पा मेधा यस्य सः अल्पमेधाः )

**३ कमलाक्षो विष्णुरस्मान्रक्षतु ।** ( कमले इव अक्षिणी यस्य सः )

४ हरिणाक्षीं शकुन्तलां दृष्ट्वा दुष्यन्तस्य चित्तमाकृष्टम् ।

( हरिणस्य इव अक्षिणी यस्याः सा )

५ पुष्पगन्धि तैलं रोचते जनेभ्यः ।

( पुष्पस्य इव गन्धः यस्य तद् पुष्पगन्धि )

६ सुगन्धीनि पुष्पाणि वाञ्छति भक्तः ।

( शोभनः गन्धः येषां तानि सुगन्धीनि )

वरील १-२ मध्यें बहुव्रीहि समासांच्या शेवटीं प्रजा व मेधा असे शब्द आहेत व त्यांचीं रूपें प्रजस् व मेधस् अशीं झाली आहेत. हा फरक प्रजा व मेधा यांपूर्वी सु, दुस्-दुर्, व नकारार्थी अ आले असतांना होतो.

३-४ वाक्यांमध्यें अन्त्य पद अक्षि असून त्याचें ' अक्ष ( स्त्री. क्षी ) ' असें रूप झालें आहे.

५-६ वाक्यांमध्यें अन्त्य पद गन्ध असून त्याचें ' गन्धि ' असें रूप झालें आहे. हा फरक समासाचें प्रथम पद उद्, सु, सुरभि किंवा उपमानवाचक शब्द असेल तरच होतो.

३० १ रमाजानिं स्मरन्भक्तो लभते मोक्षसम्पदम् ।

( रमा जाया यस्य सः रमाजानिः )

२ अनन्यजाने रामस्य यज्ञे जाया हिरण्मयी ।

( अनन्या जाया यस्य सः अनन्यजानिः )

३ प्रतिज्ञासागरस्तीर्णो यदा गाण्डीवधन्वना ।

( गाण्डीवं धनुः यस्य सः गाण्डीवधन्वा )

पाण्डवा धृतधन्वानो लेभिरे परमां मुदम् ।

( धृतं धनुः येन सः धृतधन्वा ते धृतधन्वानः )

४ सायं रम्यपथे देशे सञ्चारः सर्वदा प्रियः ।

( रम्याः पन्थानः यस्मिन् सः रम्यपथः )

५ वनं घोरपथं सीता रामेण सह प्रस्थिता ।

( घोराः पन्थानः यस्मिन् तद् घोरपथम् )

१–२ मध्यें बहु. समासाच्या 'जाया' या अन्त्यपदाबद्दल 'जानि' असा शब्द आला आहे, ३ मध्यें 'धनुस्' या अन्त्यपदाबद्दल 'धन्वन्' असें रूप झालें आहे, ४–५ मध्यें 'पथिन्' या अन्त्यपदाबद्दल 'पथ' असा फरक झाला आहे.

११ आशीर्भिरनुजग्राह सवधूकं नृपं मुनिः। ( वध्वा सह सवधूकः )
नरः सम्प्राप्तलक्ष्मीकः सर्वैरादृियते खलु। (सम्प्राप्ता लक्ष्मीः येन सः)
अयोध्या नगरी रम्या शोभते बहुदातृका। (बहवः दातारः यस्यां सा)
करुणार्हा सदा नारी या भवेद्गतभर्तृका। ( गतः भर्ता यस्याः सा )

वरील वाक्यांतील बहुव्रीहि समासांना क ( स्त्री.—का ) असा प्रत्यय लावलेला आहे. कारण त्यांतील अन्त्य पदें दीर्घ ईकारान्त व ऊकारान्त स्त्रीलिंगी नामें अथवा ऋकारान्त शब्द आहेत.

– नियमः—बहुव्रीहि समासाचें अन्त्य पद दीर्घ ईकारान्त किंवा ऊकारान्त असून तें चालवतांना त्यांचा य् किंवा व् होत असेल तर आणि अन्त्य पद ऋकारान्त शब्द असेल तर अशा बहुव्रीहि समासांना 'क' लावावा.

टीपः—( १ ) सुधीः, प्राप्तश्रीः, लब्धभूः यांना 'क' लावण्याची जरूरी नाहीं; कारण त्यांतील अन्त्य ई किंवा ऊ यांचा इय् व उव् होतो. परंतु बहुस्त्रीका· राजानः ! स्त्री हा अपवाद आहे.

( २ ) शून्यमनाः–शून्यमनस्कः परंतु रमाजानिः, कमलाक्षः ।

ज्या बहुव्रीहि समासातील अन्त्य पदामध्यें बदल होतो अशा समासांना 'क' लावूं नये. इतर ठिकाणी विकल्पानें लावावा.

१२ बहुभार्यः–बहुभार्याकः–बहुभार्यकः नृपः ।
तीक्ष्णदंष्ट्रः–तीक्ष्णदंष्ट्राकः–तीक्ष्णदंष्ट्रकः सिंहः ।
पुष्पितलतः–पुष्पितलताकः–पुष्पितलतकः प्रदेशः ।

वरील बहुव्रीहि समासांतील अन्त्य पदें आकारान्त स्त्रीलिंगी नामें आहेत म्हणून त्यांची वरीलप्रमाणें अन्त्य 'आ' चा 'अ' करून एक, 'क' लावून दुसरें व 'क' पूर्वी आ चा अ करून तिसरें अशी तीन रूपें होतात.

कौसल्या कैकेय्याः सपत्नी ।

लवस्य कुशः सोदरः–सहोदरः–सोदर्यः ।

सधर्मणोः नरयोः सख्यं भवति । सवर्णयोः विवाहः युक्तः ।

वरील वाक्यांतील अधोरेखित बहु. समासांत प्रथम पद ' स ' हें ' समान ' या अर्थी आलेलें असून त्यांचा विग्रह पुढीलप्रमाणें होतो.

समानः पतिः यस्याः सा सपत्नी । समानम् उदरं यस्य सः सोदरः–सहोदरः ।

*समानः धर्मः यस्य सः सधर्मा । समानः वर्णः यस्य सः सवर्णः ।

याच अर्थी ' स ' चा पुढील शब्दांशींहि समास होतो. गोत्र, वचन, वयस्, नामन् व बन्धु.

सपत्नी व सपत्नीकः ( नरः ) यांतील फरक ध्यानांत घ्यावा.

## नवीन शब्द

**उपकरणम्** ( न. )—साधन
**परुष** ( वि. )—कठोर
**प्रत्ययः** ( पुं. )—विश्वास
**मेधा** ( स्त्री. )—बुद्धि
**मौलिः** ( पुं. )—डोकें
**यमित** ( यम्-प्र. क. भू. धा. वि. )—बांधलेला, खेचलेला
**लवणः** ( पुं. )—राक्षसाचें नांव
**विधुः** ( पुं. )—चंद्र

---

### प्रश्न

१ पुढील श्लोकांतील समासांचा विग्रह करून नांवें सांगाः—

१ कमललोचनाया विलासवत्याः लोचनाम्बुजे पुत्रजन्मना हर्षपूर्णे जाते ।

२ रथस्यैकं चक्रं भुजगयमिताः सप्त तुरगाः ।
निरालम्बो मार्गश्चरणरहितः सारथिरपि ॥
रविर्यात्येवान्तं प्रतिदिनमपारस्य नभसः ।
क्रियासिद्धिः सत्त्वे भवति महतां नोपकरणे ॥

---

* धर्म शब्दाचें बहु. समासाचे शेवटी धर्मन् असें रूप होतें.

३ धर्मार्थे क्षीणवित्तस्य क्षीणत्वमपि शोभते ।
सुरैः पीतावशेषस्य कृष्णपक्षे विधोरिव ॥

४ ऋषीणामुग्रतपसां यमुनातीरवासिनाम् ।
लवणत्रासितः स्तोमस्त्रातारं त्वामुपस्थितः ॥

२ पुढील वाक्यांतील अधोरेखित शब्दांबद्दल सामासिक शब्द योजाः—

१ यस्य कीर्तिः धवला सः नृपः प्रजानां हिताय प्रवर्तते ।

२ यस्य ग्रीवा नीला तेन शङ्करेण यस्य आयुधं कुसुमं सः दग्धः ।

३ कोपेन सहितः पिता आत्मनः जातस्य अपराधं न अक्षाम्यत् ।

४ यस्य कोपः शीघ्रः सः दुर्वासाः कण्वस्य दुहितरं शकुन्तलाम् अशपत् ।

५ येन अपराधः कृतः तम् आत्मनः सेवकं दयया सहितः नरः परुषाणि वचनानि न वदति ।

६ युधिष्ठिरस्य वचनेन यस्य प्रत्ययः जातः सः द्रोणः येन खड्गः त्यक्तः तादृशः आसीत् ।

७ यस्य चत्वारि आननानि सः ब्रह्मा वाल्मीकेः समीपम् अगच्छत् ।

८ येन रावणस्य दश शिरांसि छिन्नानि सः रामः यस्याः अङ्गं कृशं मुखं विवर्णं च तां सीतां ददर्श ।

---

# पाठ १३

## (अ) कर्मणि विध्यर्थक धातु. विशेषणें

१ स्तोतव्यस्त्वं बधिर न वचो यः खलानां शृणोषि।
शनैः शनैश्च भोक्तव्यं स्वयं वित्तमुपार्जितम्।
त्याज्यं न धैर्यं विधुरेऽपि काले।
श्रीपतेः पदयुगं स्मरणीयम् दुस्तरं भवजलं तरणीयम्॥
नेयं सज्जनसङ्गे चित्तम्। देयं दीनजनाय च वित्तम्॥

वरील वाक्यांमध्यें एखादी क्रिया करावी अथवा करणें योग्य आहे अशा अर्थानीं धातुसाधित विशेषणें योजलेलीं आहेत. यांना **कर्मणि विध्यर्थी धातुसाधित विशेषणें** म्हणतात.

**स्तोतव्य, भोक्तव्य, त्याज्य, स्मरणीय, तरणीय, नेय** व **देय** यांतील **तव्य**प्रत्ययान्त पहिलीं दोन परिचयाचीं आहेत व त्यांची माहिती पुस्तक १ पाठ १८ मध्यें आलेली आहे.

तरणीय—तॄ–तर् + अनीय। स्मरणीय—स्मृ–स्मर् + अनीय।

नेय—नी–ने + य। देय—दा – दे + य। त्याज्य—त्यज्–त्याज् + य।

'तव्य' शिवाय 'अनीय' आणि 'य' असे दोन प्रत्यय कर्मणि विध्यर्थी धातु. विशेषणाचे आहेत. यांचा उपयोग अकारान्त विशेषणांप्रमाणें होतो. म्हणून पुल्लिंगामध्यें 'देव' प्रमाणें, नपुंसकलिंगामध्यें 'वन' प्रमाणें व स्त्रीलिंगामध्यें 'आ' जोडून 'माला' प्रमाणें, चालवतात.

### 'अनीय' प्रत्ययान्त रूपें

२ दा – दानीय। गै–गा – गानीय। जि–जे – जयनीय। श्रु – श्रो – श्रवणीय।

कृ – कर् – करणीय । भू – भो – भवनीय । तॄ – तर् – तरणीय ।

वरील रूपांवरून असें दिसून येईल कीं पहिल्या ९ गणांच्या स्वरान्त धातूंच्या अन्त्य स्वराचा 'अनीय' पूर्वी गुण होतो व ए, ऐ व ओ हे अन्त्य स्वर असणारे धातु आकारान्त समजून रूपें केलीं पाहिजेत.

पच्–पचनीय। मुच्–मोच्–मोचनीय। दृश्–दर्श्–दर्शनीय।
निन्द्–निन्दनीय। परंतु गुह्–गूह्–गूहनीय। मृज्–मार्जनीय।

१ ते ९ गणांच्या व्यंजनान्त धातूंना 'अनीय' जोडून व उपान्त्य ह्रस्व स्वराचा जरूर तेथें गुण करून रूपें करतात. परंतु गुह् यांतील उ दीर्घ होतो व मृज् यांतील ऋ ची वृद्धि–आर् होते.

प्री – प्रीणनीय। चुर् – चोरणीय। तड् – ताडनीय। कृत् – कीर्तनीय।

धृ–धारणीय। स्पृह्–स्पृहणीय। व दा–दापय–दापनीय।
पा–पालय–पालनीय। कृ–कारय–कारणीय। रुह्–रोहय–रोपय–रोहणीय–रोपणीय।

१० वा गण व प्रयोजक रूपें यांतील 'अय' काढून 'अनीय' जोडतात, मात्र 'अय' पूर्वीचे धातूंत होणारे फरक कायम राहतात.

## 'य' प्रत्ययान्त रूपें

२ दा–देय। धा–धेय। गै–गेय। सो–सेय। त्रै–त्रेय। ज्ञा–ज्ञेय।
अन्त्य आ, ए, ऐ व ओ यांचा 'य' पूर्वी 'ए' होतो.

जि–जेय। क्षि–क्षेय। क्री–क्रेय। नी–नेय। प्री–प्रेय। भी–भेय।
श्रु-श्रव्य श्राव्य। लू–लव्य–लाव्य। भू–भव्य–भाव्य। द्रु–द्रव्य-द्राव्य। नु–नव्य-नाव्य। कृ–(कृत्य)कार्य। स्मृ–स्मार्य। हृ–हार्य। भृ–(भृत्य)–भार्य। पॄ–पार्य। वृ–वार्य-वृत्य। दॄ–दार्य।

सामान्यतः अन्त्य इ-ई चा 'य' पूर्वी गुण होतो. अन्त्य उ-ऊ चा गुण व वृद्धि दोन्ही होतात, अन्त्य ऋ-ॠ ची वृद्धि होते. मात्र कांहीं ह्रस्व ऋकारान्तांच्या 'ऋ' चा फरक न करतां 'त्य' जोडूनहि रूपें होतात.

भिद्-भेद्य । बुध्-बोध्य । कॢप्-कल्प्य । नृत्-नृत्य । दृश्-दृश्य । स्पृश्-स्पृश्य । जीव्-जीव्य ।

उपान्त्य इ, उ व ऌ चा गुण होतो, परंतु उपान्त्य ऋ तसाच राहातो व इतर दीर्घ स्वर तसेच राहतात.

वच्-वाच्य । ग्रह्-ग्राह्य । वद्-वाद्य । त्यज्-त्याज्य । पठ्-पाठ्य । यज्-याज्य । परंतु क्षम्-क्षम्य । गम्-गम्य । रभ्-रभ्य । लभ्-लभ्य । शप्-शप्य ।

उपान्त्य 'अ' ची वृद्धि होते, मात्र त्या धातूचें अन्त्याक्षर पवर्गाचें असूं नये. अपवादः—शक्-शक्य । जन्-जन्य । सह्-सह्य । गद्-गद्य । मद्-मद्य । चर्-चर्य । व वप्-वाप्य । लप्-लाप्य । चम्-चाम्य । सिच्-सेक्य । पच्-पाक्य । युज्-योग्य । भुज्-भोग्य, भोज्य । परंतु याच्-याच्य । गर्ज्-गर्ज्य ।

अनिट् धातूंच्या अन्त्य च् व ज् यांचा अनुक्रमें क् व ग् होतो. याला अपवाद—वच्, त्यज्, यज्. 'युज्'ला उपसर्ग जोडला तर व भुज् याच्या ज् चा ग् विकल्पानें होतो.

**कांहीं अनियमित रूपें**:—इ-इत्य । खन्-खेय । जुष्-जुष्य । गुप्-गुप्य । गुह्-गुह्य, गोह्य । भृ-भृत्य । शास्-शिष्य । स्तु-स्तुत्य । हन्-वध्य, घात्य । शंस्-शस्य, शंस्य ।

## कर्मणि विध्यर्थक धातु. विशेषणांचा उपयोग

४ न वयं प्रायोऽनुग्राह्या देवतानाम्-देवताभिः ।
देवता भक्तैर्भक्तानां वा पूजनीयाः ।

वरील वाक्यांवरून असें दिसून येईल कीं सकर्मक धातूंच्या कर्मणि विध्यर्थी धातुसाधित विशेषणांचा विधेय म्हणून उपयोग केला असतां, मूळ कर्तृपदाचा उपयोग तृतीयेंत अथवा षष्ठींत करतात, व धातुसाधिताचा उपयोग साध्या विशेषणांप्रमाणें कर्मपदाच्या लिंग, विभक्ति व वचन यांप्रमाणें करतात.

त्वया ग्रामं गन्तव्यम् । पुत्रस्य विजयेन पित्रा मोदितव्यम् । अस्मिन् संसारे नृभिः सुखेन जीवितव्यम् । छात्रैरवहितैर्भवितव्यम्-भाव्यम् वा ।

अकर्मक धातूंच्या कर्मणि विध्यर्थी धातुसाधित विशेषणांचा विधेय म्हणून उपयोग केला तर मूळ कर्तृपदाचा उपयोग तृतीयेंत करतात व धातुसाधितांचा उपयोग नपुं. एकवचनामध्यें करतात.

**अनेन नरेण परिचितेन भवितव्यम्।**

**युष्माभिरनलसैर्भाव्यमध्ययनकर्मणि।**

वरील वाक्यांत भवितव्यम् व भाव्यम् यांचा उपयोग बहुतकरून निश्चितता किंवा शक्यता दर्शविण्याकरितां केलेला आहे, व विधेयपूरक शब्द तृतीयेंतच कर्तृपदाप्रमाणें योजलेले आहेत.

## (आ) 'णमुल्' अव्ययें किंवा 'अम्' प्रत्ययान्त धातुसाधित अव्ययें

* **स्मारं स्मारं भर्तुः सन्देशं कथयति दूतः।**
**राजपुरुषैश्चोरो बन्दिग्राहं गृहीतः।**
**सर्पः पान्थेन दण्डघातं हतः।**
**मित्रं मां नामग्राहमाह्वयति।**

वरील वाक्यांत 'अम्' प्रत्ययान्त धातुसाधित अव्ययें योजलेलीं आहेत. त्यांचा अर्थ पूर्व. धा. सा. अव्ययांसारखाच होतो. त्याचप्रमाणें 'अम्' पूर्वी अन्त्य स्वराला वृद्धि व उपान्त्य 'अ' ला वृद्धि होते व इतर उपान्त्य ह्रस्व स्वराला गुण होतो, आणि आकारान्तापुढें प्रत्ययापूर्वी 'य्' येतो. हीं बहुधा समासान्तीं जोडलेलीं असतात किंवा दोनदोनदां योजलेली असतात. श्रावम् श्रावम्। पायम् पायम्। यांना 'णमुल्' म्हणतात.

पुढील रूपें नेहमीं येतातः—मूलघातं (हन्)। अग्रेभोजम्...। कन्यादर्शम्। ब्राह्मणवेदम्। चूर्णपेषं (पिनष्टि)। हस्तग्राहम् (ग्रह्)। जीवनाशं (नश्)। केशग्राहं (युध्)। भ्रूविक्षेपं (कथ्)। नामग्राहम् (आह्वे)। यांचा स्पष्टार्थ पुढीलप्रमाणें होईलः— मूलं हत्वा। अग्रे भुक्त्वा। यां यां कन्यां पश्यति ताम् ताम्। यं यं ब्राह्मणं वेत्ति तं तम्। चूर्णम् इव पिष्ट्वा। हस्तेन गृहीत्वा। यथा जीवः नश्यति तथा। केशेषु गृहीत्वा। भ्रुवं विक्षिप्य। नाम गृहीत्वा।

टीपः—संस्कृत वाङ्मयांत यांचा फार थोडा उपयोग केलेला आढळतो.



---

### प्रश्न

१ पुढील वाक्यांत कंसांतील धातूंचीं कर्मणि विध्यर्थी धातु. विशेषणें योजाः—

१ कल्याणम् इच्छता नरेण षड् रिपवः (वि + जि)।
२ नरैः उच्चैः (स्था)।
३ ईश्वरस्य नाम (स्मृ)। ४ दुर्जनसंसर्गः सर्वदा (त्यज्)।
५ हिंस्राः पशवः (हन्)। ६ जनानां जनैः वा देवताः (पूज्)।
७ बालैः आज्ञाधारकैः (भू)। ८ सर्वैः आत्मा सङ्कटात् (रक्ष्)।
९ दोषाः मनुजैः (हा)। १० भिक्षुकैः धनिकाः (आ + श्रि)।

२ पुढील धातूंचीं सर्व प्रकारचीं कर्मणि विध्यर्थी धा. विशेषणें द्याः—

क्री, दा, गम्, श्रु, छिद्, विद्, तड्, उद् + स्था, तुप् (प्र.), भी.

३ पुढील शब्दसमुच्चयांतील पूर्व. धा. सा. अव्ययांबद्दल णमुल् रूपें योजाः—

हस्ते गृहीत्वा। पुनः पुनः स्मृत्वा। दण्डेन हत्वा। चूर्णवत् पिष्ट्वा।

४ कर्मणि विध्यर्थी धातु. विशेषणांचा उपयोग उदाहरणें देऊन स्पष्ट करा.

---

## पाठ १४

### प्रयोजक क्रियापदें ((पुढें चालू)

१ शत्रवः स्वर्गम् अगच्छन्—नृपः शत्रून्स्वर्गम् अगमयत्।
धेनुः जलं पिबति—गोपः धेनुं जलं पाययति।
बालः मोदकम् अश्नाति—माता बालकं मोदकम् आशयति।
शिष्यः धर्मं वेत्ति—गुरुः शिष्यं धर्मं वेदयति।
बालः श्लोकं गायति—पिता बालं श्लोकं गापयति।

वरील वाक्यांतील क्रियापदें गत्यर्थक, खाणें पिणें या अर्थाचीं, ज्ञानार्थक व शब्दकर्मक (ज्या क्रियेमध्यें शब्दांची आवश्यकता असते) अशीं आहेत. त्यांचीं प्रयोजक रूपें बनवितांना मूळ वाक्यांतील कर्तृपदाची द्वितीया योजलेली आहे-इतर सकर्मकांप्रमाणें तृतीया नव्हे.

परन्तु

वालः ओदनं भक्षयति—माता बालेन ओदनं भक्षयति।

वालः अन्नम् अत्ति खादति वा-माता बालेन अन्नम् आदयति खादयति वा।

अद्, खाद् व भक्ष् (हिंसार्थं नसेल तेव्हां) या भक्षणार्थी धातूंच्या प्रयोजकामध्यें मूळ कर्तृपद तृतीयेंत योजतात.

२ भृत्यः भारं नयति वहति वा-स्वामी भृत्येन भारं नाययति वाहयति वा।

नी व वह् (हाकवणारा या अर्थाचा प्रयोजक वाक्यांत कर्ता नसेल तर) यांचा प्रयोजकांत उपयोग करतांना मूळ वाक्यांतील कर्तृपदाची विभक्ति तृतीयाच असते.

३ मयः सभां करोति-युधिष्ठिरः मयेन मयं वा सभां कारयति।

भृत्यः भारं हरति-स्वामी भृत्येन भृत्यं वा भारं हारयति।

हृ व कृ यांच्या प्रयोजकांचा उपयोग करतांना मूळ वाक्यांतील कर्तृपदाची द्वितीया किंवा तृतीया योजतात.

४ सीता वनं पश्यति-रामः सीतां-सीतायै वा वनं दर्शयति।

'दृश्' या ज्ञानार्थी क्रियापदाच्या प्रयोजकाचा उपयोग करताना मूळ वाक्यांतील कर्तृपदाची द्वितीया किंवा चतुर्थी योजतात.

५ भिक्षुकः धनं गृह्णाति-धनिकः भिक्षुकेण भिक्षुकं वा धनं ग्राहयति।

रामः भार्यां त्यजति-रजकः रामेण रामं वा भार्यां त्याजयति।

ग्रह्, त्यज् व त्याचप्रमाणें मुच् व लभ् या क्रियापदांच्या प्रयोजकांचा उपयोग करतांना मूळ वाक्यांतील कर्तृपदांची द्वितीया किंवा तृतीया विभक्ति योजण्याचा प्रघात आहे.

टीपः—वरील विषयासंबंधी विस्तृत माहिती स.-वाक्यरचना पाठ ४१ मध्यें पहावी.

## प्रयोजक वाक्यांचा कर्मणि प्रयोग

कर्तरि — कर्मणि

६ वातः समुद्रं क्षोभयति—वातेन समुद्रः क्षोभ्यते।

पुत्रः पितरं तोषयति—पुत्रेण पिता तोष्यते।

कर्तरि — कर्मणि

स्वामी सूदेन अन्नं पाचयति—स्वामिना सूदेन अन्नं पाच्यते।

माता बालेन अध्ययनम् आरम्भयति—मात्रा बालेन अध्ययनम् आरम्भ्यते।

प्रयोजक वाक्यांचा प्रयोग बदलतांना कर्तरि प्रयोगांत जो शब्द द्वितीयेंत असेल त्याचा कर्मणि प्रयोगांत प्रथमेंत उपयोग करतात व त्या नवीन प्रथमान्त पदाला जुळेल असें क्रियापदाचें कर्मणि रूप बनवितात.

क्षोभ्यते–तोष्यते–पाच्यते–आरम्भ्यते।

हीं प्रयोजक कर्मणि रूपें प्रयोजकाच्या 'अय' चा लोप करून व कर्मणि 'य' आणि आत्मनेपदी प्रत्यय जोडून केलेलीं आहेत.

नृपः शत्रून् स्वर्गं गमयति–नृपेण शत्रवः स्वर्गं गम्यन्ते।

माता बालम् अन्नम् आशयति–मात्रा बालः अन्नम् आश्यते किंवा

मात्रा बालम् अन्नम् आश्यते!

गुरुः शिष्यान् धर्मम् अध्यापयति–गुरुणा शिष्याः धर्मम् अध्याप्यन्ते किंवा गुरुणा शिष्यान्धर्मः अध्याप्यते।

पिता बालं श्लोकं गापयति–पित्रा बालः श्लोकं गाप्यते किंवा

पित्रा बालं श्लोकः गाप्यते।

गत्यर्थक धातूंच्या प्रयोजकाचा कर्मणि प्रयोग करतांना मूळ वाक्यांतील कर्तृपद (जें कर्तरि प्रयोजक वाक्यांत द्वितीयेंत असतें) प्रथमेंत योजतात; त्याचप्रमाणें बुद्ध्यर्थक, भक्ष्यार्थक व शब्दकर्मक धातूंच्या प्रयोजकांचा कर्मणि प्रयोग करतांना दोन्ही द्वितीयान्त शब्दांपैकीं कोणताहि एक प्रथमेंत योजतात.

भिक्षुकः धनिकं धनं याचते।

दैवं भिक्षुकेण धनिकं धनं याचयति।

दैवेन भिक्षुकेण धनिकः धनं याच्यते।

गुरुः शिष्यं प्रश्नं पृच्छति।

स्वामी गुरुणा शिष्यं प्रश्नं प्रच्छयति।

स्वामिना गुरुणा शिष्यः प्रश्नं प्रच्छ्यते।

वरील उदाहरणांवरून असें दिसून येईल कीं द्विकर्मक धातूंच्या कर्तरि प्रयोजकांचा कर्मणि प्रयोग करतांना नेहमींच्या नियमांप्रमाणें नी, कृष्, हृ व वह् यांशिवाय इतर द्विकर्मक धातूंच्या मूळच्या दोन कर्मपदांपैकीं गौण कर्मपदाचाच प्रथमेंत उपयोग करतात.

## प्रयोजक धातुसाधित रूपें

७ १ रथं वाहयतः अश्वान्सारथिः प्रचोदयामास ।
पुरा गुरुणा अध्याप्यमानाः छात्राः गुरुगृहे एव अवसन् ।
ध्रुवाय आत्मानं दर्शयमानः विष्णुः तस्य समीपे स्थितः ।
२ दिलीपेन धेनुः सन्तोषिता किंवा दिलीपः धेनुं सन्तोषितवान् ।
सगरपुत्रैः कोपितः कपिलः तान्भस्मसात् अकरोत् ।
३ सैनिकान्समराङ्गणं प्रस्थाप्य सेनापतिः निवृत्तः ।
लवकुशौ आत्मनः गानकौशलं दर्शयित्वा रामस्य पुरतः स्थितौ ।
केचिन्मुनयः शिरांसि अवनमय्य तपः आचरन्ति ।
४ राजसभायाः अपराधिनं निःसारयितुं द्वारपालाः प्रवृत्ताः ।
मालाकारः उद्याने पुष्पवृक्षान् आरोपयितुम् इच्छति ।
५ प्रजाभिः नृपः सन्तोषयितव्यः एव ।
पुरोहितैः यजमानः याजयितव्यः ।

वरील वाक्यांत प्रयोजकांचीं निरनिराळीं धातुसाधित रूपें योजलेली आहेत.

१ वाहयतः—वाहयति–वाहयत् वर्त. धातु. वि. प. पदी
दर्शयमानः—दर्शयते–दर्शयमान ,, ,, ,, आ. पदी
अध्याप्यमानाः—अध्यापयति–अध्याप्यते–अध्याप्यमानाः– वर्त. धातु. विशेषण कर्मणि रूप.

२ सन्तोषिता—सन्तोषयति–सन्तोष्+इ+त–कर्मणि भूत. धा. वि.
कोपितः—कोपयति–कोप्+इ+त– ,, ,,

३ प्रस्थाप्य—प्रस्थापयति–प्रस्थाप्+य–पूर्व. धा. सा. अव्यय
दर्शयित्वा—दर्शयति–दर्शय्+इ+त्वा ,, ,,
अवनमय्य—अवनमयति–अवनमय्+य ,, ,,

४ निःसारयितुम् – निःसारयति–निःसारय्+इ+तुम्–हेत्वर्थक तुमन्त अव्यय
आरोपयितुम्—आरोपयति–आरोपय्+इ+तुम् " " "

५ सन्तोषयितव्यः—सन्तोषयति–सन्तोषय्+इ+तव्य–कर्मणि विध्यर्थी धा. वि.
याजयितव्यः—याजयति–याजय्+इ+तव्य " " " "

वरील पृथक्करणावरून हें दिसून येईल कीं १, २, ४ व ५ यांमध्यें दशम गणाच्या धातूंच्या रूपांप्रमाणें प्रयोजक धातु. रूपें झाली आहेत. ३ मध्यें 'त्वा' पूर्वी 'अय' मधील अन्त्य 'अ' चा लोप झाला आहे व उपसर्गसहित धातूंच्या प्रयोजकाच्या 'अ' चा लोप झाला आहे; कारण त्या 'अय' पूर्वी उपान्त्य ह्रस्व स्वर नाहीं ('अवनमय' यांतील अय (अन्त्य अ शिवाय) कायम राहिला आहे).

---

## प्रश्न

१ पुढील वाक्यांची प्रयोजक वाक्यें बनवाः—

१ मारुतिः द्रोणगिरिं स्कन्धेन आनयत् । २ बालाः गीताम् अधीयन्ताम् । ३ भगीरथः उग्रं तपः अकरोत् । ४ साधुः षड् रिपून् निगृह्णीयात् । ५ सीता ऋष्यमूकं ददर्श ।

२ पुढील वाक्यांचा प्रयोग बदला व त्यांची मूळ वाक्यें लिहाः—

१ हारीतः शुकं जलबिन्दून् अपाययत् । २ दूतः रामं जनापवादम् अश्रावयत् । ३ सेनापतिः वीरान् शत्रुम् अभ्यगमयत् । ४ आचार्यः शिष्यान् तत्त्वं वेदयामास । ५ युधिष्ठिरः मयेन सभां निर्मापयामास ।

३ पुढील रूपें ओळखून त्यांचा वाक्यांत उपयोग कराः—

व्यापादयितव्यः । उन्नमय्य । घातयितुम् । अध्याप्य । प्रस्थापित । दर्शितवान् । तोषयन्ती । उत्थापनीयः । आरोपितः । निःसारयितुम् ।

४ उद् + स्था, आ + रभ्, वि + जि याच्या प्रयोजकांची सर्व काळ व अर्थ यांची तृ. पु. ए. वचनी रूपें द्या व त्याचप्रमाणें सर्व धातुसाधित विशेषणें व अव्ययें लिहा.

---

# पाठ १५

## नामें व विशेषणें



१ कांश्चिद्विषयानुद्दिश्य प्राचां तथा च प्रतीचां जनानां भिन्नानि मतानि वर्तन्ते। तिर्यञ्चोऽपि शाश्वतिकं विरोधमपहाय तपोवनवसतिसुखमनुभवन्ति। प्राच्यां दिशि सूर्य उदयते प्रतीच्यां चास्तं गच्छति। भारतवर्षादुदीच्यां दिशि तिष्ठति हिमालयः।

वरील वाक्यांत प्राच्, प्रत्यच्, तिर्यच् व उदच् या दिशावाचक विशेषणांचीं रूपें योजलेली आहेत. त्यांचीं रूपें पुढें लिहिल्याप्रमाणें होतात.

### प्राच् ( पुं. )

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| प्राङ् | प्राञ्चौ | प्राञ्चः | प्र. | प्राचः | प्राग्भ्याम् | प्राग्भ्यः | पं. |
| प्राञ्चम् | „ | प्राचः | द्वि. | „ | प्राचोः | प्राचाम् | ष. |
| प्राचा | प्राग्भ्याम् | प्राग्भिः | तृ. | प्राचि | „ | प्राक्षु | स. |
| प्राचे | „ | प्राग्भ्यः | च. | प्राङ् | प्राञ्चौ | प्राञ्चः | स. |

### प्राच् ( न. )

प्र. द्वि. सं.—प्राक्-ग् प्राची प्राञ्चि. इतर रूपें पुल्लिंगाप्रमाणें.

### प्राच् ( स्त्री. )

प्राची प्राच्यौ प्राच्यः प्र. प्राचीम् प्राच्यौ प्राचीः द्वि. नदीप्रमाणें.

( १ ) पुल्लिंगामध्यें प्रथमा, द्वि. ( एकवचन व द्विवचन ) व संबोधन या रूपांमध्यें अन्त्य ‘ च् ’ पूर्वी अनुनासिक येतें. ( २ ) पुं. द्वि. बहुवचनाच्या ‘ अस् ’ या प्रत्ययापूर्वी जो फरक शब्दांत होतो तोच इतर स्वरारंभी प्रत्ययांपूर्वी होतो.

(३) संबोधनाचीं रूपें पुं. व न. यांमध्यें प्रथमेप्रमाणेंच होतात. (४) नपुंसकलिंगी रूपें 'जगत्' प्रमाणें प्र. द्वि. व सं. यांमध्यें होतात व इतर पुल्लिंगाप्रमाणें होतात. (५) स्त्रीलिंगामध्यें नपुं. द्विवचनी रूपें मूळ समजून नदीप्रमाणें चालवितात.

**प्रत्यच्, सम्यच्, उदच्, अवाच्** व **तिर्यच्** यांचीं रूपेंहि **प्राच्** प्रमाणें होतात. या शब्दांचीं कांहीं महत्त्वाची रूपें—

| पुल्लिंगी-प्रथमा ए. व. | द्वि व. | द्वितीया ब. व. | तृतीया द्वि व. | सप्तमी ब. व. |
|---|---|---|---|---|
| प्रत्यच्—प्रत्यङ् | प्रत्यञ्चौ | प्रतीचः | प्रत्यग्भ्याम् | प्रत्यक्षु |
| सम्यच्—सम्यङ् | सम्यञ्चौ | समीचः | सम्यग्भ्याम् | सम्यक्षु |
| उदच्—उदङ् | उदञ्चौ | उदीचः | उदग्भ्याम् | उदक्षु |
| अवाच्—अवाङ् | अवाञ्चौ | अवाचः | अवाग्भ्याम् | अवाक्षु |
| तिर्यच्—तिर्यङ् | तिर्यञ्चौ | तिरश्चः | तिर्यग्भ्याम् | तिर्यक्षु |

नपुंसकलिंगी—प्रथमा–द्वितीया–संबोधन एकाच तऱ्हेचीं.

प्रत्यच्—प्रत्यक्-ग् प्रतीची प्रत्यञ्चि। सम्यच्—सम्यक्-ग् समीची सम्यञ्चि।
उदच्—उदक्-ग् उदीची उदञ्चि। अवाच्—अवाक्-ग् अवाची अवाञ्चि।
तिर्यच्—तिर्यक्-ग् तिरश्ची तिर्यञ्चि।

स्त्रीलिंगी—नपुंसकलिंगी प्र. द्विवचनी रूप मूळ शब्द समजून नदीप्रमाणें चालवावें.

**२ उदाराणां नराणामग्रण्या कर्णेन समो न कोऽपि पृथिव्यां जातः।**
**कौरवाणां सेनान्यो द्रोणाचार्यस्य शीर्षं धृष्टद्युम्नेन छिन्नम्।**
**स्वार्थो यस्य परार्थ एव हि सतामेको नृणामग्रणीः।**
**भारतवर्षे यथा पुरुषास्तथा स्त्रियोपि सेनान्यो जाताः।**

वरील वाक्यांत **सेनानी** व **अग्रणी** या शब्दांचीं रूपें योजलेलीं आहेत.

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| सेनानीः | सेनान्यौ | सेनान्यः | **प्र.** | सेनान्यः | सेनानीभ्याम् | सेनानीभ्यः | **पं.** |
| सेनान्यम् | सेनान्यौ | सेनान्यः | **द्वि.** | सेनान्यः | सेनान्योः | सेनान्याम् | **ष.** |
| सेनान्या | सेनानीभ्याम् | सेनानीभिः | **तृ.** | सेनान्याम् | सेनान्योः | सेनानीषु | **स.** |
| सेनान्ये | सेनानीभ्याम् | सेनानीभ्यः | **च.** | सेनानीः | सेनान्यौ | सेनान्यः | **सं.** |

' सेनानी ' प्रमाणें ' अग्रणी ' शब्द चालवावा. षष्ठी ब. व. व सप्तमी ए. व. हीं सारखींच होतात.

टीप—हे शब्द बहुशः पुल्लिंगामध्येंच चालतात. स्त्रीलिंगी नामांचें विशेषण म्हणून योजले असतानाहि पुल्लिंगाप्रमाणेंच चालतात.

३ वर्षारम्भे वर्षाभ्व उच्चैरारटन्ति । पुनर्भूणां धर्मक्रियासु नाधिकार इति पुराणमतवादिनां मतम् । स्वयम्भुवा ब्रह्मणैषा सृष्टिर्विनिर्मिता । सुधिया नरेणोत्कर्षार्थं प्रयत्नः कार्यः ।

वरील वाक्यांत वर्षाभू, पुनर्भू, स्वयम्भू व सुधी या शब्दांचीं रूपें योजलेलीं आहेत.

## वर्षाभूः—बेडूक–बेडकी ( पु. स्त्री. )

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| वर्षाभूः | वर्षाभ्वौ | वर्षाभ्वः | प्र. | वर्षाभ्वः | वर्षाभूभ्याम् | वर्षाभूभ्यः | पं. |
| वर्षाभ्वम् | वर्षाभ्वौ | वर्षाभ्वः | द्वि. | वर्षाभ्वः | वर्षाभ्वोः | वर्षाभ्वाम् | ष. |
| वर्षाभ्वा | वर्षाभूभ्याम् | वर्षाभूभिः | तृ. | वर्षाभ्वि | वर्षाभ्वोः | वर्षाभूषु | स. |
| वर्षाभ्वे | वर्षाभूभ्याम् | वर्षाभूभ्यः | च. | वर्षाभूः | वर्षाभ्वौ | वर्षाभ्वः | सं. |

' पुनर्भू ' याचा ' पुनश्च भवति ' असा अर्थ असेल तेव्हां ' वर्षाभू ' प्रमाणें चालवावा.

## पुनर्भूः ( स्त्री. )—पुनर्विवाहित स्त्री

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| पुनर्भूः | पुनर्भ्वौ | पुनर्भ्वः | प्र. | पुनर्भ्वाः | पुनर्भूभ्याम् | पुनर्भूभ्यः | पं. |
| पुनर्भ्वम् | पुनर्भ्वौ | पुनर्भ्वः | द्वि. | पुनर्भ्वाः | पुनर्भ्वोः | पुनर्भूणाम् | ष. |
| पुनर्भ्वा | पुनर्भूभ्याम् | पुनर्भूभिः | तृ. | पुनर्भ्वाम् | पुनर्भ्वोः | पुनर्भूषु | स. |
| पुनर्भ्वै | पुनर्भूभ्याम् | पुनर्भूभ्यः | च. | पुनर्भु | पुनर्भ्वौ | पुनर्भ्वः | सं. |

' वीरसू–वीराला प्रसवणारी ' हा शब्द वरील ' पुनर्भू ' शब्दाप्रमाणें चालवावा.

## स्वयम्भूः (पुं.)—ब्रह्मदेव      सुधीः (पुं.)–चांगल्या बुद्धीचा

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| स्वयम्भूः | स्वयम्भुवौ | स्वयम्भुवः | प्र. सं. | सुधीः | सुधियौ | सुधियः |
| स्वयम्भुवम् | स्वयम्भुवौ | स्वयम्भुवः | द्वि० | सुधियम् | सुधियौ | सुधियः |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| स्वयम्भुवा | स्वयम्भूभ्याम् | स्वयम्भूभिः | तृ. | सुधिया | सुधीभ्याम् | सुधीभिः |
| स्वयम्भुवे | स्वयम्भूभ्याम् | स्वयम्भूभ्यः | च. | सुधिये | सुधीभ्याम् | सुधीभ्यः |
| स्वयम्भुवः | स्वयम्भूभ्याम् | स्वयम्भूभ्यः | पं. | सुधियः | सुधीभ्याम् | सुधीभ्यः |
| स्वयम्भुवः | स्वयम्भुवोः | स्वयम्भुवाम् | ष. | सुधियः | सुधियोः | सुधियाम् |
| स्वयम्भुवि | स्वयम्भुवोः | स्वयम्भूषु | स. | सुधियि | सुधियोः | सुधीषु |

टीपः—स्वयम्भू व सुधी यांचीं स्त्रीलिंगी रूपें भू व श्री यांचे रूपांप्रमाणें करावीं. पुस्तक २, पाठ ४ पहा. नपुंसकलिंगाची रूपे अन्त्य स्वर ऱ्हस्व करून 'मधु व वारि' प्रमाणें करावीं. पुस्तक १—पाठ १३ व १४ पहा.

.४ इन्द्रेण वृत्रासुरो हत इति स वृत्रहा इत्युच्यते ।
यदा कोऽपि शतं क्रतूंस्तनोति तदा वृत्रघ्नो मनसि भयं जायते ।
अस्तङ्गते भगवति पूष्णि सर्वत्रान्धकारः प्रसरति ।
पूष्णे नम इत्युक्त्वा बालः सूर्यं नमति ।
पितॄणामर्यमा चास्मि इति श्रीकृष्णेन कथितम् ।

वरील वाक्यांत **वृत्रहन्** व **पूषन्** या पुल्लिंगी शब्दांचीं रूपें योजलेलीं आहेत.

## वृत्रहन् ( पुं. )—इन्द्र

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| वृत्रहा | वृत्रहणौ | वृत्रहणः | प्र. | वृत्रघ्नः | वृत्रहभ्याम् | वृत्रहभ्यः | पं. |
| वृत्रहणम् | वृत्रहणौ | वृत्रघ्नः | द्वि. | वृत्रघ्नः | वृत्रघ्नोः | वृत्रघ्नाम् | ष. |
| वृत्रघ्ना | वृत्रहभ्याम् | वृत्रहभिः | तृ. | वृत्रघ्नि-हणि | वृत्रघ्नोः | वृत्रहसु | स. |
| वृत्रघ्ने | वृत्रहभ्याम् | वृत्रहभ्यः | च. | वृत्रहन् | वृत्रहणौ | वृत्रहणः | सं. |

'पूषन् ( पुं. )—सूर्य' व 'अर्यमन् ( पुं. )—सूर्य किंवा पितरांमधील श्रेष्ठ' हे शब्दहि वृत्रहन्प्रमाणेंच चालतात.

'पूषन्' याची प्र. व. द्वि.—पूषा पूषणौ पूषणः । पूषणम् पूषणौ पूष्णः ।

'अर्यमन्' याची प्र. व द्वि.—अर्यमा अर्यमणौ अर्यमणः । अर्यमणम् अर्यमणौ अर्यम्णः । इतर रूपें वरीलप्रमाणें करावी.

## नवीन शब्द

अग्रणीः ( पुं. )–पुढारी
अवाच् ( वि. )–दक्षिणेकडील
आ+रट् ( १ प. प. )–ओरडणें
उदच् ( वि. )–उत्तरेकडील
क्रतुः ( पुं. )–यज्ञ
तिर्यच् ( वि. )–तिरपा,
( पुं. )–क्षुद्र प्राणी

प्रत्यच् ( वि. )–पश्चिमेकडील
प्राच् ( वि. )–पूर्वेकडील
ललाटंतप ( वि. )–डोक्यावर आलेला
शाश्वतिक ( वि. )–चिरकालीन
सम्यच् ( वि. )–बरोबर–योग्य असणारा
सेनानीः ( पुं. )–सैन्याचा नायक
स्वयम्भू ( वि. )–स्वतः उत्पन्न होणारा

---

### प्रश्न

१ पुढील वाक्यांत कंसांतील शब्दांची योग्य तीं रूपें योजा :—

१ आश्चर्यं यत् ( तिर्यच् ) अपि मनुजानां साहाय्यं कुर्वन्ति ।
२ सिन्धुः ( प्रत्यच् ) सागरे बहुभिर्मुखैः पतति ।
३ भारतवर्षे बहुषु स्थानेषु ( स्वयम्भू ) शिवलिङ्गानि दृश्यन्ते ।
४ ललाटंतपे ( पूषन् ) दीर्घप्रवासखिन्नः पान्थो मूर्च्छामापद्यते ।
५ तपोधनानाम् ( अग्रणी ) जाबालेस्तनयेन शुको रक्षितः ।
६ कौरवाणां ( सेनानी ) कर्णं शल्यो निरुत्साहतां नीतवान् ।
७ ( वर्षाभू ) तडागानां वापीनां वा तीरेषु वसन्ति ।
८ भारतवर्षे सर्वासां ( वर्षाभू ) भागीरथी पवित्रतमा ।
९ ( सुधी ) सङ्गमो महोत्कर्षाय कल्पते ।
१० अधुना ( पुनर्भू ) ज्ञातिभिर्न तिरस्क्रियन्ते ।

२ पुढील रूपें ओळखून त्यांचा वाक्यात उपयोग कराः—
तिरश्चाम्, उदीचः, वृत्रघ्ना, पूषणम्, स्वयम्भुवे, सुधीनाम्, वर्षाभ्वाम्, पुनर्भ्वाः, सेनान्याम्, अग्रण्यम्.

---

# पाठ १६

## ( अ ) इच्छार्थक रूपें

१ पिपासति जलं स्वच्छं तृषाक्रान्तो विहङ्गमः। ( पातुम् इच्छति )
जिहीर्षसि परस्वं त्वं ततः पापमवाप्स्यसि। ( हर्तुम् इच्छसि )
शुश्रूषस्व गुरून्कुरु प्रियसखीवृत्तिं सपत्नीजने। ( श्रोतुम् इच्छ )
धर्मनिष्ठो नरः प्रायो जिजीविषेच्छतं समाः। (जीवितुम् इच्छेत्)
नर आत्महितं नित्यं बुबोधिषति सर्वदा। ( बोधितुम् इच्छति )

वरील वाक्यांतील क्रियापदें हीं निरनिराळ्या धातूंचीं इच्छार्थक रूपें आहेत. हें कंसांत दिलेल्या अर्थावरून ध्यानांत येईल. त्यांच्या रूपांवरून पुढील गोष्टी ध्यानांत येतील:—

( १ ) धातूला अभ्यास झालेला आहे—प-पपा-पिपा; बुध्-बुबुध्. अभ्यासांत बहुतेक अ बद्दल इ येतें.

( २ ) प्रत्ययांपूर्वी धातूंना 'स' जोडलेला आहे. ( नतर तेथें 'स' चा 'ष' होईल ).

( ३ ) अनिट् धातूंना 'स' पूर्वी 'इ' लावलेला नाहीं. ( पिपासति, जिहीर्षसि) व सेट् ,, ,, ,, ,, ,, आहे. (बुबोधिषति, जिजीविषेत्) अर्थात् वेट् धातूंना 'स' पूर्वी 'इ' विकल्पानें जोडावी लागेल.

( ४ ) इच्छार्थकांचीं रूपें सर्व काळ व अर्थ यांमध्यें करतां येतात, व धातूंचें मूळ पद कायम राहतें. मात्र ज्ञा, स्मृ, श्रु व दृश् यांचीं रूपें आत्मनेपदींच होतात. जसें—जिज्ञासते, सुस्मूर्षते, शुश्रूषते, दिदृक्षते.

टीप — [illegible] इच्छार्थकांच्या रूपांमध्यें होतात, परंतु [illegible] [illegible] [illegible] [illegible] अल्पत्वामुळें नियम

दिलेले नाहींत. इच्छार्थकाचा उपयोग क्रिया करण्याची इच्छा दर्शविण्याकरितां करतात. बहुधा हीं रूपें वर्तमानकाळींच उपयोगात येतात.

२ शुश्रूषमाणा शबरी मुनीन्सर्वांश्चिरं स्थिता ।
जिघांसन्मूषिकां श्येनो मुनिना सन्निवारितः ।
धनुर्भङ्गं हि रामेण सीतां परिणिनीषता ।

वरील वाक्यांत इच्छार्थकांच्या वर्तमानकालवाचक धातु. विशेषणांचा उपयोग केलेला आहे.

शुश्रूषन्ते – अन्ते + मान । जिघांसन्ति – अन्ति + अत् । परिणिनीषन्ति– अन्ति + अत् ।

इच्छार्थकांचीं वर्त. धातु. विशेषणें सामान्य वर्तमान. धातु. विशेषणांप्रमाणें तयार करतां येतात, व त्याचप्रमाणें तिन्ही लिंगांमध्यें चालतात.

३ ज्ञानस्य लिप्सां हृदये धारयेदखिलो जनः ।
सागरो मथितो देवैरमृतस्य पिपासया ।
जलं पिपासुः पथिको प्रस्थितः सरसीं प्रति ।
आश्रयेद्भक्तिनौकां ना तितीर्षुर्भवसागरम् ।
युयुत्सवो महावीरा प्रस्थिताः समराङ्गणम् ।
निनर्तिषुः सरस्वत्या मयूरो वर्तते सदा ।

वरील वाक्यांत इच्छार्थकांची आकारान्त भाववाचक नामें व उकारान्त विशेषणात्मक नामें योजलेलीं आहेत. सकर्मक धातूंची आकारान्त रूपें कर्मपदाची षष्ठी योजून व उकारान्त रूपें कर्मपदाची द्वितीया योजून उपयोगांत आणलेलीं आहेत. अर्थात् अकर्मक धातूंच्या इच्छार्थकांसंबंधीं हा प्रश्नच उद्भवत नाहीं.

टीपः—मुमूर्षुः नरः, सुषुप्सुः बालः यातील अकर्मक धातूच्या इच्छार्थक रूपांचा अर्थ इच्छात्मक नसून क्रिया घडण्याच्या बेतांत असलेला असा अर्थ आहे.

४ बीभत्सते भवात्साधुः पापादपि जुगुप्सते ।
मीमांसते परं तत्त्वं परदोषांस्तितिक्षते ॥

यांतील क्रियापदें इच्छार्थक धातूंसारखीं दिसतात, तरी त्यांचा अर्थ साध्या क्रियापदांसारखाच होतो. बध् ( तिरस्कार करणें )—बीभत्सते । तिज् ( सहन करणें )-तितिक्षते । गुप् (तिटकारा करणें)-जुगुप्सते। मान् ( संशोधन करणें )-मीमांसते । कित् ( बरें करणें )-चिकित्सति-ते ।

## कांहीं उपयुक्त इच्छार्थक रूपें

५ १ ( इ घेणारीं )—वद्-विवदिषति । बुध्-बुबुधिषति-बुबोधिषति। विद्-विविदिषति । प्रच्छ्-पिपृच्छिषति । गम्-जिगमिषति । मुद्-मुमुदिषते-मुमोदिषते । जीव्-जिजीविषति । रक्ष्-रिरक्षिषति । सेव्-सिषेविषते । स्मि-सिस्मयिषते ।

२ ( इ विकल्पानें घेणारीं )—तृप्-तितृप्सति-तितर्पिषति । नृत्-निनृत्सति-निनर्तिषति । तॄ-तितीर्षति-तितरि-रीषति । वृध्-विवृत्सति-विवर्धिषते ।

३ (इ न घेणारीं)—वच्-विवक्षति-ते । युध्-युयुत्सते । ग्रह्-जिघृक्षति-ते । कृ-चिकीर्षति-ते । हृ-जिहीर्षति । स्तु-तुष्टूषति-ते । गै-जिगासति भू-बुभूषति । स्वप्-सुषुप्सति । मृ-मुमूर्षति । नी-निनीषति-ते । ज्ञा-जिज्ञासते । स्मृ-सुस्मूर्षते । श्रु-शुश्रूषते । दृश्-दिदृक्षते ।

४ ( अनियमित रूपें )—जि-जिगीषति । हि-जिघीषति । चि-चिकीषति. ते-चिचीषति-ते । हन्-जिघांसति । इ-जिगमिषति । आप्-ईप्सति । मस्ज्-मिमङ्क्षति । रम्-रिप्सते । लभ्-लिप्सते । शक्-शिक्षति । मुच्-मुमुक्षति-ते । पद्-पित्सते । पत्-पित्सति-पिपतिषति । मा-मित्सते । नश्-निनङ्क्षति-निनशिषति । अधि + इ ( आ. )-अधिजिगांसते । प्रति + इ-प्रतीषिषति । दा-दित्सति-ते । धा-धित्सति-ते । स्था-तिष्ठासति । अद्-जिघत्सति ।

## ( आ ) आशीर्वादार्थ

६ शकुन्तलायाः पन्थाः शान्तानुकूलपवनो भूयात्।

पायाद्वः स विभीषणाग्रजनिहा रामाभिधानो हरिः । (पायात्)

स्थेयासुरुच्चैर्विद्वांसो लब्ध्वा बह्वर्थसम्पदम्।
लप्सीष्ट विजयं नित्यं प्रजाहितरतो नृपः।
मोदिषीरञ्जनाः सर्वे वर्धिषीरंश्च पार्थिवाः।

वरील वाक्यांत भू, पा ( २ प. ) व स्था या प. पदी धातूंचीं आणि लभ्, मुद् व वृध् या आत्मनेपदी धातूंची आशीर्वादार्थक रूपें उपयोगांत आणलेलीं आहेत. आशीर्वादार्थक रूपें आशीर्वाद देण्याकरितां उपयोगांत आणलीं जातात. आज्ञार्थानेंहि हें काम होऊं शकतें.

| भू ( प. प. ) | मुद् ( आ. प. ) |
|---|---|
| भूयासम् भूयास्व भूयास्म। | मोदिषीय मोदिषीवहि मोदिषीमहि। |
| भूयाः भूयास्तम् भूयास्त। | मोदिषीष्ठाः मोदिषीयास्थाम् मोदिषीध्वम्। |
| भूयात् भूयास्ताम् भूयासुः। | मोदिषीष्ट मोदिषीयास्ताम् मोदिषीरन्। |

## प्रत्यय

प. प.—यासम् यास्व यास्म। याः यास्तम् यास्त। यात् यास्ताम् यासुः।

आ. प.—सीय सीवहि सीमहि। सीष्ठाः सीयास्थाम् सीध्वम्। सीष्ट सीयास्ताम् सीरन्।

## परस्मैपदी रूपें

जि—जीयात्। कृ—क्रियात्। स्मृ—स्मर्यात्। तॄ—तीर्यात्। वच्—उच्यात्।

सामान्यतः कर्मणि 'य' पूर्वी धातूंत जे फरक होतात ते परस्मैपदी आशीर्वादार्थी प्रत्ययांपूर्वी होतात, कारण त्यांचा आरंभ 'य' नें होतो व ते अपित् आहेत परंतु

ज्ञायात्—ज्ञा। पायात्—पा ( २ प. )। यायात्—या। स्नायात्—स्ना। परंतु दा—देयात्। धा—धेयात्। स्था—स्थेयात्। सो—सेयात्। पा—पेयात्। गै—गेयात्।

कर्मणि 'य' पूर्वी ज्या आकारान्त किंवा ए, ऐ व ओ हे अन्त्य स्वर असणाऱ्या धातूंच्या 'आ' चा 'ई' होतो त्यांचा आशीर्वादार्थाच्या प. प.

प्रत्ययांपूर्वी ‘ए’ होतो व ज्यांच्या ‘आ’ चा फरक होत नाहीं त्यांचा आ तसाच राहातो.

टीपः—आशीर्वादार्थाच्या प. पदी रूपांकरिता धातु सेट्, वेट् कीं अनिट् हें पाहावें लागत नाहीं.

## आत्मनेपदी रूपें

लभ्—लप्सीष्ट। कृ—कृषीष्ट। भिद्—भेत्सीष्ट। स्तु—स्तोषीष्ट।

लू—लविषीष्ट। स्तॄ—स्तीर्षीष्ट—स्तरिषीष्ट। मुद्—मोदिषीष्ट।

गाह्—गाहिषीष्ट—घाक्षीष्ट। क्लृप्—क्लृप्सीष्ट—कल्पिषीष्ट।

स्तृ—स्तृषीष्ट—स्तरिषीष्ट।

वरील रूपांवरून हें ध्यानांत येईल कीं आशीर्वादार्थी आत्मनेपदी रूपें करतांना धातु सेट्, वेट् व अनिट् असेल त्याप्रमाणें प्रत्ययांपूर्वी ‘इ’ चा उपयोग करावा लागतो. मात्र अनिट् धातूंपैकीं संयुक्त व्यंजनयुक्त ऋकारान्त, वृ व ‘ॠ’ कारान्त धातु यांना ‘इ’ विकल्पानें जोडतात.

त्याचप्रमाणें आ. पदी प्रत्यय **पित्** आहेत. म्हणून त्यांपूर्वी मूळ अन्त्य स्वर व उपान्त्य ह्रस्व स्वर यांना गुण झाला आहे. परंतु ज्या वेळीं ऋकारान्त धातूला ‘इ’ जोडीत नाहींत त्या वेळी ह्रस्व **ऋ** चा गुण होत नाही व दीर्घ **ॠ** चा **ईर्** किंवा मागें **पवर्ग**व्यंजन किंवा **व** असेल तर **ऊर्** होतो.

७ **ईश्वरेण नो यशो दासीष्ट—दायिषीष्ट।**
**त्वया शत्रवो वधिषीरन्—घानिषीरन्।**
**गुरुभिश्छात्रा अनुग्रहीषीरन्—अनुग्राहिषीरन्।**

वरील वाक्यांच्या रचनेवरून हें लक्षांत येईल कीं, हीं कर्मणि प्रयोगाचीं वाक्यें आहेत. अर्थात् इतर आर्धधातुक काळ व अर्थ याप्रमाणें धातूंना आत्मनेपदी प्रत्यय लावून त्यांपूर्वी योग्य ते फारक केले म्हणजे कर्मणि रूपें होतात. त्याचप्रमाणें स्वरान्त व हन्, ग्रह्, दृश् यांची कर्मणि रूपें भविष्यकाळाप्रमाणें दोन दोन प्रकारांनीं होतात.

---

### प्रश्न

१ पुढील वाक्यांत कंसांतील धातूंचीं योग्य तीं इच्छार्थक रूपें योजाः—

१ सज्जनः दुर्जनसङ्गतिं ( परि + हृ ) । २ साधुः परस्य कार्यं ( कृ ) । ३ धनस्य ( लभ् ) सर्वेषां मनः अभिनिविशते । ४ जलं ( पा ) पान्थः तडागं गच्छति । ५ भवसागरं ( तॄ ) नरेण भक्तिः कार्या । ६ चोरं ( ग्रह् ) सैनिकः तम् अन्वसरत् । ७ विजयम् ( आप् ) वीरेण पराक्रमः कर्तव्यः । ८ तत्त्वं ( ज्ञा ) नरेण तपः कर्तव्यम् । ९ जयद्रथं ( हन् ) अर्जुनः प्रतिज्ञां चकार । १० उत्सवस्य ( दृश् ) बालः देवालयं गतः ।

२ पुढील रूपें ओळखून वाक्यांत योजाः—

गेयासुः । लप्सीरन् । दृश्यासुः । अनुभूयात् । युयुत्सवः । शुश्रूषध्वम् । जिगमिषन् । बुबूर्षुः । बिभित्सति । विवक्षुः ।

३ चिकीर्षति हें ‘ कृ ’ चें इच्छार्थक रूप आहे. त्याची सर्व काळ व अर्थ यांचीं तृतीयपुरुषी रूपें द्या व इतर धातुसाधित अव्ययें व विशेषणेंहि लिहा.

---

# पाठ १७

## तृतीय भूतकाळ ( सामान्य भूतकाळ )

१ पुरा त्रेतायुगे सुमेरौ केसरी नाम वानरोऽवात्सीत् । तस्य भार्यायामञ्जन्यामजनि जगत्प्राणो वायुर्हनुमद्रूपेण । स हनुमाञ्जातमात्र एव गगनमुदपतत्सूर्यं खाद्यं मत्वा । हनुमतो वेगं दृष्ट्वा विस्मिता अभूवन् देवा दानवाश्च । आदित्य आत्मानं

खादितुमागतं तं ज्ञात्वापि तं नाधाक्षीत्। सूर्यं ग्रसितुमागतो राहुर्भीत्वा पुरन्दरं व्यजिज्ञपत्। इन्द्र ऐरावतमारुह्य मारुतिमभ्यगात्। तस्य पराक्रमं दृष्ट्वा भीतः पाकशासनस्तं वज्रेणातीतडत्। तदाधः सुमेरौ पतितस्य मारुतेर्हनुः किञ्चिदभौक्षीत्। अतः सोऽलब्ध हनुमानित्यभिधानम्।

वरील उताऱ्यांत **अवात्सीत्** ( वस् १ प. ), **अजनि** ( जन् ४ आ. ) **उदपतत्** ( उद् + पत् १ प. ), **अभूवन्** ( भू १ प. ), **अधाक्षीत्** (दह् १प.), **व्यजिज्ञपत्** ( वि+ज्ञा–प्र. ), **अभ्यगात्** ( अभि+इ २ प. ), **अतीतडत्** ( तड् १० प. ), **अभौक्षीत्** ( भुज् ६ प. वाकणें ), **अलब्ध** ( लभ् १ आ. ) अशीं क्रियापदें आहेत.

( १ ) यांचा अर्थ भूतकाळी आहे परंतु ही रूपें प्रथम भूतकाळाचीं किंवा द्वितीय भूतकाळाचीं नव्हेत. ( २ ) यांच्या आरंभीं **अ** किंवा **आ** हा आगम आलेला आहे. ( ३ ) तृ. पु. ए. वचनी प. पदी प्रत्यय **त्** आहे व आ. पदी **त** आहे. हीं सर्व रूपें **तृतीय भूतकाळीं** आहेत. तृतीय भूतकाळाचा उपयोग अगदीं नुकतीच घडलेली किंवा सामान्यभूतकाळी क्रिया दर्शविण्याकरितां करतात परंतु संस्कृत वाङ्मयामध्यें भूतकाळी क्रिया कोणत्याहि भूतकाळी रूपानें दर्शवितात विशेष माहितीकरितां सं. वाक्यरचना पाठ ५० पहा.

तृतीय भूतकाळाचे एकंदर सात प्रकार आहेत.

## पहिला प्रकार

**२ देवा अमृतमपुः। वयं देवालयस्य समीपेऽस्थाम।**
**त्वं दरिद्रेभ्यो धनमदाः। रामो लक्ष्मणमभ्यधात्।**

वरील वाक्यांतील पा, स्था, दा व धा या धातूंचीं तृ. भूतकाळीं रूपें पहिल्या प्रकारचीं आहेत.

अपाम् अपाव अपाम। अपाः अपातम् अपात। अपात् अपाताम् अपुः।

**प्रत्ययः**—अम् व म। स् तम् त। त् ताम् उस्।

वरील प्रत्यय प्रथमभूतकाळाच्या प्रत्ययांसारखेच आहेत.

स्था–अस्थात्। दा–अदात्। धा–अधात्। दो-दा–अदात्। इ-गा–अगात्। घ्रा–अघ्रात्। सो–सा–असात्।

भू धातूचीं रूपें:—अभूवम् अभूव अभूम। अभूः अभूतम् अभूत। अभूत् अभूताम् अभूवन्।

टीप:—हा पहिला प्रकार फक्त प. पदी आहे. म्हणून वरीलपैकीं जे धातु आत्मनेपदी आहेत त्यांचीं आ. पदी रूपें ४ थ्या किंवा ५ व्या प्रकाराप्रमाणें होतील.

## दुसरा प्रकार

३ रामो वनवासार्थमगमत्। मारुतिः सुमेरा अपतत्। गुरुः शिष्यमवोचत्।
बालश्चन्द्रमदर्शत्। नरः शरीरं चन्दनेनालिपत। कृष्णः चाणूरमाह्वत।

वरील वाक्यांतील रूपें तृ. भूतकाळाच्या दुसऱ्या प्रकारचीं आहेत.

या प्रकारांत कांहीं धातूंचीं आत्मनेपदी रूपेंहि होतात.

| प. पद | वच् (वोच्) | | आ. प. | | |
|---|---|---|---|---|---|
| अवोचम् | अवोचाव | अवोचाम | अवोचि | अवोचावहि | अवोचामहि |
| अवोचः | अवोचतम् | अवोचत | अवोचथाः | अवोचेथाम् | अवोचध्वम् |
| अवोचत् | अवोचताम् | अवोचन् | अवोचत | अवोचेताम् | अवोचन्त |

वरील सर्व प्रत्यय प्रथम भूतकाळाप्रमाणेंच आहेत.

या प्रकारामध्यें कांहीं धातु नित्य आहेत व कांहीं वैकल्पिक आहेत.

कांहीं नित्य धातुः—अस् (४ उ.)–आस्थत्-त। ख्या (२ उ.)–अख्यत्-त। शास्–अशिषत्। ऋ–आरत्। लिप् (६ उ.)–अलिपत्-त। सिच् (६ उ.)–असिचत्-त। ह्वे (१ प.)–अह्वत्। आ + ह्वे (१ आ.)–आह्वत। आप्–आपत्। गम्–अगमत्। पत्–अपप्तत्। मुच्–अमुचत्। विद् (६ प.)–अविदत्। सद्–असदत्। लुप्–अलुपत्। व चौथ्या गणाचे व्यंजनान्त प. पदी धातु.

विकल्पानें चालणारे कांहीं धातुः—छिद्–अच्छिदत्। जॄ–अजरत्।

दृश्–अदर्शत्। श्वि–अश्वत्। रुध्–अरुधत्। रुद्–अरुदत्। बुध्–अबुधत्।
पहिल्या गणाचे आ. पदी धातु या प्रकारांत प. पदामध्यें चालतात. जसें:—

द्युत्–अद्युतत्। वृत्–अवृतत्। ध्वंस्–अध्वसत्। शुभ्–अशुभत्। स्रंस्–अस्रसत्।

टीपः—या प्रकारांतील जे वैकल्पिक धातु आहेत ते आ. पदामध्यें ४ थ्या किंवा ५ व्या प्रकाराप्रमाणें चालतात.

## तिसरा प्रकार

**४ सुग्रीवो मारुतिं लङ्कां प्रातिष्ठिपत्। ( प्र + स्था – प्र. )**
**कृष्णः पाण्डवानां पक्षमशिश्रियद्-त। ( श्रि – उ. )**
**मयो धर्मस्य राजसभामरीरचत्-त। ( रच् – १० उ. )**

वरील वाक्यांतील क्रियापदें तृतीय प्रकारचीं आहेत. वरील रूपांवरून असें दिसून येईल कीं (१) दशम गण, प्रयोजक व श्रि ( उ. प. ), कम् ( १ आ. प. ) या धातूंची रूपें या प्रकाराप्रमाणें होतात. ( २ ) धातूंना अभ्यास करावा लागतो. ( ३ ) प्रत्यय प्र. भूत काळाचे प्रत्ययांसारखेच दोन्ही पदांचे असतात.

प. प. **पूज्** ( १० उ. प. ) आ. प.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अपूपुजम् | अपूपुजाव | अपूपुजाम | अपूपुजे | अपूपुजावहि | अपूपुजामहि |
| अपूपुजः | अपूपुजतम् | अपूपुजत | अपूपुजथाः | अपूपुजेथाम् | अपूपुजध्वम् |
| अपूपुजत् | अपूपुजताम् | अपूपुजन् | अपूपुजत | अपूपुजेताम् | अपूपुजन्त |

## कांहीं धातूंचीं रूपें

श्रि–अशिश्रियत्-त। द्रु–अदुद्रुवत्। कम्–अचकमत-अचीकमत।

द. गणः—तड्–अतीतडत्-त। चुर्–अचूचुरत्-त। धृ–अदीधरत्-त। कथ्–अचकथत्–त; अचीकथत्-त। पीड्–अपिपीडत्-त, अपीपिडत्-त।

प्रयोजकः—कृ-कारय–अचीकरत्। भिद्–भेदय-अबीभिदत्। भू–भावय-अबीभवत्। बुध्–बोधय-अबूबुधत्। नी–नायय–अनीनयत्। इष्–एषय-ऐषिषत्। स्तु–स्तावय-अतुष्टवत्। वृत् (वर्तय)–अववर्तत्-अवीवृतत्। सेव्–सेवय-असिषेवत्।

स्मृ-स्मारय-असस्मरत् । अधि + इ-अध्यापय-अध्यापिपत् । अधिगमय-अध्यजीगमत् । पा-पायय-अपीप्यत् । स्था-स्थापय-अतिष्ठिपत् । स्वप्-स्वापय-असूषुपत् । ह्वे-ह्वायय-अजूहवत्-अजुहावत् । घ्रा-घ्रापय-अजिघ्रिपत्-अजिघ्रपत् ।

**५ मा भूदुपद्रव आश्रमवासिनाम्।** मा ( अ ) भूत्

**हे मनः मा स्म गाः कातरत्वम्।** मा स्म ( अ ) गाः

वरील वाक्यांत **अभूत् व अगाः** हीं तृ. भूत. रूपें आगमाचा लोप करून **मा** किंवा **मा स्म** या निषेधार्थक अव्ययांबरोबर योजलेलीं आहेत; कारण त्यांचा वरील वाक्यांत आज्ञार्थाप्रमाणें उपयोग केलेला आहे. जसें—आश्रमांतील लोकांना उपद्रव न होवो. हे मना, भिऊं नको.

## नवीन शब्द

**कातरत्वम्** ( न. )-भित्रेपणा
**पाकशासनः** ( पुं. )-इन्द्र
**श्वि** ( १ प. )-वाढणें

---

## प्रश्न

१ पुढील रूपें ओळखून त्याच धातूंचीं प्रथमभूतकाळी रूपें लिहाः—

अचकथत् । अपुः । निरगात् । उदपप्तन् । अवोचः । निरास्थत् ।
अशिषन् । अजीगणत । अपूपुजाम । अगमन् । प्रापन् ।
अद्युतम् । अवीवृतः । अध्यापिपन् । अपीप्यत् । अभूवन् ।

२ पुढील वाक्यांत कंसांतील धातूंची तृतीय भूतकाळी रूपें योजा :—

१ कपोताः सममेव ( उद् + पत् ) । २ देवाः विष्णुम् ( अभि + धा ) ३ देवाः अमृतम् ( पा ) । ४ रामः सीतालक्ष्मणाभ्यां सह अयोध्यायाः ( निर्+इ ) । ५ स्तेनः धनिकस्य धनम् ( चुर् ) । ६ सुग्रीवः मारुतिं लङ्कां ( प्र+स्था प्र. ) । ७ कृष्णः कंसं द्वन्द्वाय ( आ+ह्वे ) । ८ सैनिकाः रणाङ्गणं ( प्र+आप् ) । ९ गुरुः शिष्यान् धर्मम् ( शास् ) । १० सेनापतिः सैनिकान् ( गण् ) ।

दिवशीं घंटा घेऊन पळून जाणाऱ्या चोराला एका वाघानें मारला आणि खाऊन टाकला. त्याच्या हातांतून पडलेली ती घंटा कांहीं वानरांनी घेतली व ते ती एक-सारखी वाजवूं लागले. त्या खेड्यांतील लोकांना तो मारून खाऊन टाकलेला मनुष्य जेव्हां दिसला व घंटेचा आवाजहि एकसारखा ऐकूं आला तेव्हां त्यांना वाटलें की, रागावलेला घंटाकर्णच मनुष्यांना खाऊन घंटा वाजवतो. म्हणून त्या गांवांतील सर्व लोक पळून गेले. त्या गांवांत एक वृद्ध स्त्री राहत होती. घंटा अवेळीं वाजतांना ऐकून तिला वाटलें कीं राक्षसाशिवाय दुसरा कोणीतरी घंटा वाजवीत असावा. म्हणून तिनें ती घंटा माकडेंच वाजवितात अशी खात्री करून घेतली व ती त्या देशाच्या राजाकडे जाऊन म्हणाली, 'महाराज, आपण जर मला वरेंच द्रव्य द्याल तर मी घंटाकर्णाचा बंदोबस्त करीन.' तिला द्रव्य मिळालें तेव्हां तिनें माकडांपासून ती घंटा काढून घेतली व तेव्हांपासून घंटेचा आवाज बंद झाला व सर्व लोक पुन्हां त्या गांवांत राहूं लागले.

९

फार प्राचीन काळी महर्षि वेदव्यास कैलास पर्वतावर शंकराकडे जाऊन त्याला म्हणाले, 'हे देवाधिदेवा, आपण सर्वांची पापें नाहीशीं करितां. आपण ज्ञानाचें निधान आहां. तेव्हां आपण माझ्या या शुक नांवाच्या मुलाला दिव्य ज्ञान शिकवा.' हें ऐकून शंकरांनीं शुकाला परम तत्त्व शिकविलें. त्यामुळें, शुकाचें मन शुद्ध व ज्ञानयुक्त झालें व त्याला ईश्वरज्ञान झालें. त्याला सर्वत्र ईश्वर दिसूं लागला. शंकराला नमस्कार करून तो ईश्वरभक्तिसागरांत मग्न झाला. या परिणामामुळें व्यासांना दुःख होऊन ते 'शुका, शुका इकडे ये,' असें म्हणत त्याचे पाठीमागून जाऊं लागले. शुक हा सर्व चराचर सृष्टीशी एकरूप झाला असल्या-कारणानें व्यासांच्या हांकेला, सभोवतालच्या, टेकड्या, प्रवाह, वृक्ष, प्राणी व मनुष्य यांच्याकडून प्रत्युत्तर मिळत होतें. हें पाहून व्यासांना आपल्या मुलाच्या मोठेपणाबद्दल, सुखाबद्दल आनंद वाटला.

१०

महात्मा साक्रेटिस हा एक मोठा ग्रीक तत्त्ववेत्ता असून सर्व मनुष्यांमध्यें अतिशय शहाणा व उत्तम होता. तो इतका धर्मशील होता कीं ईश्वराचा सल्ला

घेतल्याशिवाय तो कोणतीहि गोष्ट करीत नसे. म्हणूनच त्यानें कोणाला यत्किंचित्‌हि त्रास दिला नाहीं. एवढेंच नव्हे तर पुष्कळांना त्यानें मदत केली. तो सुखापेक्षां सद्‌गुणाला जास्त किंमत देत असे व अडचणी असतांनाहि शहाणपणानें तो मार्ग काढीत असे. आपले सहकारी लोक ज्यास्त सुखी व चांगले व्हावे याबद्दल त्याचे परिश्रम चालू असत. अशा तऱ्हेचा हा उदार वृत्तीचा मनुष्य सुद्धां लोकनिन्देपासून अलिप्त नव्हता. त्याची स्त्री त्याचेवर फार रागावत असे. एकदां तिनें त्याचे अंगावर चिखलाचें पाणी ओतले. परंतु सॉक्रेटिसानें आपली मनोवृत्ति ढळूं दिली नाही. तो शांत राहिला व म्हणाला 'विजेचा कडकडाट झाल्यावर थोडासा पाऊस हा पाहिजेच.' अशा तऱ्हेनें सॉक्रेटिसानें असामान्य शांतता धरली होती.

## ११

अल्पबुद्धि नांवाचा एक मनुष्य चोऱ्या करून आपली उपजीविका करीत असे. एकदां एका श्रीमान् मनुष्याच्या घरांतील दागदागिने त्यानें चोरले, म्हणून त्याला न्यायाधीशापुढें उभें करण्यांत आलें. न्यायाधीशानें तूं गुन्हा कां केलास असा प्रश्न विचारला तेव्हां तो अल्पबुद्धि मोठ्या गंभीरपणें म्हणाला, 'महाराज, मीं चोरी केली नाहीं, तर या माझ्या उजव्या हातानें घराच्या भिंतीला भोंक पाडून द्रव्याची पेटी पळविली. मी त्या वेळी घराच्या बाहेर होतों. महाराजांनीं मला शिक्षा करूं नये, कारण मी निरपराधी आहें.' न्यायाधीशांनीं त्या चोराचें बोलणें शांतपणें ऐकून घेतलें व ते म्हणाले, 'हे अल्पबुद्धे, तुझें म्हणणें मी खरें मानतों. हा तुझा उजवा हात तुला फार त्रासांत लोटतो. म्हणून तुला शिक्षा न करतां तुझ्या उजव्या हातालाच ५ वर्षांची तुरुंगवासाची शिक्षा करतों. ज्याप्रमाणें तुझ्या हातानें चोरी केली त्या वेळीं तूं बाहेर होतास, त्याचप्रमाणें तुझा उजवा हात शिक्षा भोगीपर्यंत तूं तुरुंगाच्या बाहेर राहा.' ही शिक्षा ऐकून तो अल्पबुद्धि चकित झाला व त्यानें शिक्षा भोगली.

## १२

अयोध्येचा राजा अम्बरीष यानें यज्ञ करण्यास आरंभ केला तेव्हा यज्ञांतील पशु इन्द्रानें पळवून नेला व त्यामुळें यज्ञकृत्य थांबलें. राजाच्या दोषामुळें यज्ञांत विघ्न येतें असा समज असल्यामुळें आपल्यावरचा दोष कसा जाईल या चिन्तेनें अम्बरीषाचें मन व्यग्र झालें. तेव्हां पुरोहितांनीं सांगितलें कीं एकादा नरपशु

आणल्यास यज्ञ सुरू करतां येईल. म्हणून द्रव्यलोभानें कोणी आपला मुलगा विकण्यास तयार आहे कीं काय याबद्दल राजानें शोध चालविला. शेवटीं त्याला ऋचीक नांवाच्या ऋषीचा शुनःशेप नांवाचा मुलगा मिळाला. राजा त्याला नेत असतां त्या मुलानें तपश्चर्या करणाऱ्या विश्वामित्र ऋषींना पाहिलें व आपल्यास सोडण्याबद्दल त्यांची प्रार्थना केली. विश्वामित्र ऋषींनीं त्याला वांचविण्याकरितां आपल्या मुलांपैकीं एकाला बळी जाण्यास तयार व्हावयास सांगितलें. परंतु कोणीहि तयार होईना म्हणून त्यांनीं त्यांना शाप दिला. नंतर त्यांनीं शुनःशेपाला धीर देऊन अग्नीचे दोन मंत्र म्हणावयास सांगितलें. तेव्हां त्याला धीर येऊन तो अम्बरीषाबरोबर आनंदानें यज्ञमंडपांत गेला. जेव्हां योग्य वेळीं दर्भाच्या दोरीनें तो बांधला गेला तेव्हां त्यानें विश्वामित्रांनीं दिलेले दोन मंत्र म्हटले. तेव्हां देव संतुष्ट होऊन त्यांनी त्याला दीर्घायुष्य दिले व अम्बरीषाला यज्ञफल दिलें.

## १३

वाल्मीकि हा मूळचा ब्राह्मणाचा मुलगा होता. तो लहान असतांनाच त्याचे आईबाप त्याला रानांत टाकून तपश्चर्येसाठीं निघून गेले. परंतु त्या रानांतील भिल्ल लोकांना त्याची दया आली व त्यांनीं त्याला आपल्या घरी नेऊन स्वतःच्या मुलाप्रमाणें ममतेनें वाढवलें. लहानपणापासून भिल्लांत वाढल्यामुळें तो ब्राह्मणाचा मुलगा भिल्लांसारखा वागूं लागला. त्यानें वाटमाऱ्याचा धंदा सुरू केला व तो आपल्या बायकामुलांचें पोट भरूं लागला. हा त्याचा उपजीविकेचा क्रम पुष्कळ वर्षें चालू होता. एके दिवशीं त्याची व एका ऋषीची गांठ पडली. नेहमींप्रमाणें त्यानें त्या ऋषीला धमकावलें. तेव्हां तो दयाळू ऋषि म्हणाला, 'अरे, दुसऱ्याला त्रास देऊन अन्यायानें त्याला लुबाडणें हें एक मोठें पाप आहे. ज्यांच्याकरितां तूं हें पाप करतोस ते तुझ्या पापाचे वाटेकरी होणार नाहींत. वाटल्यास घरीं जाऊन बायकामुलांना ही गोष्ट विचारून ये. मी येथें बसून राहतों.' हा प्रश्न ऐकून त्याला आश्चर्य वाटलें व तो बायकामुलांस विचारण्याकरितां घरीं गेला. तेव्हां त्याला असें कळून आलें कीं, पापाचा हिस्सा घेण्याला कोणीहि खुषी नाहीं. तें पाहून वाल्मीकीच्या अंतःकरणांत उजेड पडला व त्याला वाईट वाटलें. पश्चात्ताप होऊन तो ऋषीकडे गेला व त्यानें आपली चुकी कबूल केली.

१४

एकदां विन्ध्य पर्वताची रमणीय शोभा पाहात पाहात रावण नर्मदेच्या तीरावर गेला. त्यावेळी दुपार झाल्यामुळें त्यानें तेथेच महादेवाची पूजा केली. ज्या ठिकाणी रावण पूजा करीत होता तेथून जवळच सहस्रार्जुन नदीच्या प्रवाहांत क्रीडा करीत होता त्यानें आपल्या सहस्र बाहूंनीं प्रवाह अडविला तेव्हां पाणी ज्यास्त ज्यास्त वाढूं लागलें व रावण ज्या ठिकाणी बसला होता त्या ठिकाणापर्यंत येऊन पोहोंचलें. त्या वेळीं रावण ध्यानमग्न होता म्हणून त्याला कांहीं कळलें नाहीं. परंतु जेव्हां रावणानें डोळे उघडले तेव्हां महादेवाच्या पिण्डीवरील फुलें पाण्यावरोबर दूर गेलेलीं दिसली व बसण्याच्या जागीं पाणी आलेलें दिसलें. हें पाहून तो आश्चर्यचकित झाला व त्यानें राक्षसांस त्याचा शोध लावण्यास सांगितले. तेव्हां एका मोठ्या बलवान् पुरुषानें पाणी अडविलें आहे असें त्यांस दिसलें. तो सहस्रार्जुन असावा हें रावणानें ओळखलें व त्याला युद्धाचे आव्हान दिले. त्या युद्धामध्यें सहस्रार्जुनानें एक जोराचा तडाखा रावणाचे छातीवर दिला. तेव्हां रावण एकदम खालीं पडला. सहस्रार्जुनानें रावणाला बांधलें व त्याला घेऊन राजधानीत प्रवेश केला. परंतु पुलस्त्य ऋषींनी त्याची सुटका केली.

१५

पंढरपुरांत एकदा मोठा दुष्काळ पडला व धान्यहि मिळेनासें झालें. तेव्हां लोक मुंग्यांसारखे मरू लागले हें पाहून तेथील अधिकारी दामाजीपंत याला अतिशय दुःख झालें व त्यानें सरकारी कोठारात सांठविलेलें धान्य लोकांना देण्याचा विचार केला. इतक्या लोकांच्या रक्षणासाठीं आपणावर जरी बादशहाची इतराजी झाली तरी चालेल, परंतु लोकांचे प्राण जाणें बरें नाही असें मनात आणून त्यानें सर्व धान्य वाटून टाकलें. बादशहाच्या कानावर जेव्हा ही बातमी गेली तेव्हा त्यानें दामाजीपंतास पकडून आणण्यासाठीं शिपाई पाठविले. दामाजीपंत जावयास तयार झाला. परंतु जाण्यापूर्वी देवाचें दर्शन घेण्याची परवानगी त्यानें मागितली. लोकांवर उपकार करून त्यांचे जीव वाचविणाऱ्या दामाजीपंतावर शेवटीं असें संकट आलेलें पाहून लोकांना दुःख झाले व त्यांनी

दामाजीपंताची सुटका करण्याबद्दल देवाची प्रार्थना केली. भक्त मोठ्या संकटांत आहे असें पाहून देवानें एका अन्त्यजाचा वेष घेतला व बादशहाला धान्याची किंमत दिली. तेव्हां बादशहानें त्याला सोडण्याबद्दल अधिकाऱ्याला हुकूम पाठविला.

१६

पूर्वी पाटलिपुत्र नांवाच्या नगरीत नन्द नांवाचा राजा राज्य करीत होता. एकदां नंदानें चाणक्य नांवाच्या विद्वान् ब्राह्मणाला जेवायला बोलाविलें. त्या वेळीं नन्दानें त्याचा अपमान केला. म्हणून सूड उगविण्याकरितां त्यानें नन्दाचा दासीपुत्र जो चंद्रगुप्त त्याला आश्रय देऊन नंद वंशाचा नायनाट केला. अशा रीतीनें आपली प्रतिज्ञा पुरी करून त्यानें चंद्रगुप्ताला गादीवर बसविलें. नंद राजाच्या पदरीं राक्षस नांवाचा एक स्वामिभक्त व कर्तव्यनिष्ठ प्रधान होता. नंदाचा संपूर्ण नाश झाला तरीसुद्धां त्याची नंदावर निस्सीम भक्ति असल्यामुळें नंदाचें राज्य परत मिळविण्याचा त्यानें आटोकाट प्रयत्न चालविला. इकडे राक्षसाला वश करून त्यालाच चंद्रगुप्ताचें मंत्रिपद द्यावें व चंद्रगुप्ताच्या राज्याला बळकटी आणावी या खटपटींत चाणक्य गुंतला होता. परंतु राक्षस महाचतुर व कारस्थानी असल्यामुळे तो सहजासहजीं वश होणें शक्य नव्हतें. नंदाचा विध्वंस करण्याचे कामी पर्वतेश्वर नावाच्या राजानें चाणक्यास मदत केली होती. परंतु पुढें चाणक्याच्या कारस्थानानेंच पर्वतेश्वर मारला गेला. तेव्हां त्याचा मुलगा मलयकेतु हा बापाच्या मृत्यूबद्दल चाणक्यावर सूड उगविण्याच्या खटपटीत होता. याचा फायदा राक्षसानें घेण्याचें ठरविलें व दोघांनीं मिळून चाणक्यावर चाल करून जावयाचें असें ठरविलें.

१७

वडिलांच्या आज्ञेप्रमाणें कादम्बरीला सोडून चन्द्रापीड उज्जयिनीस परत आला. परंतु त्याचें मन कादंबरीकडे लागलें होतें. तिची हकीकत कळण्यास तो अतिशय उत्सुक झाला होता. इतक्यांत पत्रलेखा कादम्बरीकडील निरोप घेऊन आली. तेव्हा चन्द्रापीडाला फार आनंद झाला त्यानें तिला सर्व हकीकत विचारली. पत्रलेखा म्हणाली कीं, कादम्बरीला आपल्यावांचून मुळींच करमत नाहीं. मी आपल्याला घेऊन येतें असें तिला कबूल करून इकडे आलें आहें. कादम्बरीची

अवस्था ऐकून धीरगम्भीर स्वभावाच्या चन्द्रापीडालाहि फार वाईट वाटलें. त्यानें पत्रलेखेला सांगितलें कीं माझी चूक झाली. आतां मी कादम्बरीला सुखी करण्याची पराकाष्ठा करीन. फार काय प्राणांचीहि पर्वा करणार नाही. इतक्यांत विलासवतीचा निरोप आला कीं पत्रलेखेला घेऊन लवकर माझ्याकडे ये. तिला पाहून फार दिवस झाले आहेत. आईचा निरोप ऐकतांच चन्द्रापीडाच्या मनाची द्विधा वृत्ति झाली. एकीकडे आईचा निरोप मोडवेना व दुसरीकडे कादम्बरीबद्दल मनाला ओढ लागलेली. शेवटीं त्यानें प्रथम आईकडे जावयाचें ठरविलें व त्याप्रमाणें तो गेला

## १८

गोकुळांतील गवळी पांवसाळ्याच्या अखेरीस चांगला पाऊस पडल्याबद्दल इन्द्राचे उपकार मानण्याकरितां शक्रोत्सव करीत असत. या उत्सवाची केलेली तयारी पाहून कृष्ण म्हणाला, ‘आपण इन्द्राचा उत्सव न करतां आपलें हित करणाऱ्या गाई व हा गोवर्धन पर्वत यांचाच उत्सव करूं या.’ सर्व गोकुळाची कृष्णावर पूर्ण भक्ति असल्यामुळें त्या गोपगोपींनीं लगेच बेत बदलला व कृष्णाच्या सूचनेप्रमाणें उत्सव केला. ही गोष्ट इन्द्रास समजतांच तो रागावला व त्यानें गोकुळावर मुसळधार पाऊस सुरू केला. सर्व गोकुळ जलमय झालें. गाई पाण्यांत बुडून मरूं लागल्या. सर्व गोकुळाचा नाश होणार हें पाहून सर्व लोक कृष्णाची प्रार्थना करूं लागले व म्हणाले, ‘देवा, आतां तुझ्यावांचून आम्हांला दुसरा आधार नाही. आमचें रक्षण कर.’ तेव्हां श्रीकृष्णानें त्यांना एकत्र जमविलें व गोवर्धन पर्वत उचलून छत्रीसारखा गोकुळावर धरला. त्यामुळें गोकुळांत पाण्याचा एक थेंबसुद्धां आला नाहीं. पुष्कळ वेळ इन्द्रानें पाऊस पाडला, परंतु कृष्णाच्या सामर्थ्यापुढें आपलें कांही चालत नाहीं असें वाटून त्यानें पाऊस थांबवला.

## १९

यौगंधरायण व वासवदत्ता हीं वेष पालटून नगराबाहेर निघून गेलीं. चालतां चालतां तीं एका आश्रमांत आलीं. यौगंधरायणानें तापसाचें व वासवदत्तेनें तापसीचे अशीं सोंगें घेतलीं होतीं. याच वेळीं कर्मधर्मसंयोगानें पद्मावती तेथें

आली होती. ती पुष्कळ दानधर्म करीत असे. तिनें अशी घोषणा करविली कीं कोणीहि मनुष्यानें पद्मावतीकडे यावें व काय पाहिजे असेल तें मागून घ्यावें. ही संधि साधून तापसरूप यौगंधरायणानें पद्मावतीस अशी विनंति केली कीं हे राजभगिनी, माझी बहीण आपल्याजवळ ठेव म्हणून ठेवून घे. मी हिला कांहीं दिवसांनीं घेऊन जाईन. हिचा नवरा दूर देशास गेला आहे. त्याचा शोध करून मी हिला घेऊन जाईन. ही चमत्कारिक मागणी ऐकून पद्मावतीला आश्चर्य वाटलें, परंतु आपला शब्द खरा करण्याकरितां तिनें ती गोष्ट मान्य केली. ती म्हणाली, मी हिला आपल्या मैत्रिणीप्रमाणें वागवीन. तुम्ही अगदीं काळजी करूं नका. तिनें अशा शब्दांनीं आश्वासन दिल्यावर यौगंधरायण आपल्या पुढील बेताच्या तयारीकरितां निघून गेला.

## २०

श्वेतकेतु नांवाचे एक अति तेजस्वी ऋषि होते. ते देवपूजेकरितां आकाशगंगेंतील कमळें तोडीत असतां देवी लक्ष्मीनें त्यांना पाहिलें. तेव्हा तिला वाटलें कीं आपणास या ऋषींसारखाच तेजःपुंज मुलगा व्हावा. लक्ष्मी त्या वेळीं एका शुभ्र कमलावर बसली होती, त्यांतूनच एक कुमार तत्क्षणीं उत्पन्न झाला. तिनें तो पुत्र ऋषिवर्यास अर्पण केला व म्हटलें कीं मुनिमहाराज हा आपलाच मुलगा आहे, याचा स्वीकार करावा. श्वेतकेतूंनी तिचें म्हणणें कबूल केलें व त्या मुलाचे जातकर्मादि संस्कार केले व पांढऱ्या कमळातून तो उत्पन्न झाला असल्यामुळें त्याचें पुण्डरीक असें नांव ठेविलें. पुढें त्याचें उपनयन करून ऋषींनीं त्यास वेदविद्या शिकविली. तोच पुण्डरीक आपल्या कपिंजल नांवाच्या मित्राबरोबर महेश्वराच्या दर्शनास जात होता, व वाटेंत त्यांना नंदनवन दिसलें. तेथें ते दोघे थोडासा वेळ थांबले. त्या वेळीं त्या नन्दनवनाच्या अधिदेवतेनें पारिजातकाची कळी पुण्डरीक नको नको म्हणत असतांहि त्याचे कानावर ठेवली. त्या पारिजातकाच्या कळीचा सुवास जिकडे तिकडे सर्व दिशांना पसरला व त्यानें महाश्वेता नांवाच्या गन्धर्वकन्येचें मन आपल्याकडे वेधून घेतलें.

## २१

अज्ञातवासांत विराटाच्या नोकरींत पाण्डव असता सैरन्ध्रीच्या वेषानें दासी

म्हणून द्रौपदी तेथें राहिली. विराटाचा बलाढ्य सेनापति कीचक याचें तिच्यावर मन गेलें व तो तिला छळूं लागला. तेव्हां आपल्यास या संकटांतून भीमाशिवाय कोणी सोडवणार नाहीं असें वाटून तिनें भीमास सर्व हकीकत सांगितली. भीमानें कीचकाला ठार मारण्याची प्रतिज्ञा केली. मग द्रौपदीनें कीचकाला सांगितलें कीं, 'तुम्ही मध्यरात्रीं नृत्यशाळेंत या. तेथें तुमचे मनोरथ पूर्ण करीन.' हें ऐकून कीचकाला अति आनंद झाला. रात्रीं नृत्यशाळेंत द्रौपदीच्या ऐवजीं भीमच पांघरूण घेऊन निजला. ठरल्या वेळीं कीचक आला व त्यानें निजलेल्या द्रौपदीला स्पर्श केला. तेव्हां भीमानें त्या दुष्टाला एकदम पकडलें. दोघे बराच वेळ एकमेकांशीं लढले. शेवटीं भीमानें कीचकाला ठार मारलें व दूर फेंकून दिलें! अशा रीतीनें भीमानें द्रौपदीचें संकट निवारिलें.

## २२

महाश्वेता आपल्या आईबरोबर मोठ्या पहाटेस उठून अच्छोद सरोवरावर स्नान करण्याकरितां गेली असता प्रातःकाळच्या शीतल वायूबरोबर एक अत्यंत मनोहर असा सुवास तिला आला. अशा प्रकारचा सुवास पूर्वीं कधींहि मिळाला नसल्या-मुळें तो कोठून आला हें जाणण्याची उत्सुकता तिच्या मनामध्यें उत्पन्न झाली. म्हणून ती आईला मागे टाकून त्या सुगंधाचा तपास करीत इकडे तिकडे भटकूं लागली. इतक्यांत तिला एक तेजस्वी ऋषिकुमार ध्यानस्थ बसलेला दिसला. त्याच्या कानावर एक सुंदर फूल होतें. त्याचाच तो सुवास असावा असें तिला वाटलें. त्या ऋषीला पाहून तिला विधात्याच्या कौशल्याबद्दल आश्चर्य वाटलें, कारण त्याचें सौन्दर्य मदनालाहि मागे टाकील असें होतें. ती तेथें थोडा वेळ उभी राहिली व जाण्यापूर्वीं त्याच्या जवळ बसलेल्या दुसऱ्या ऋषिकुमाराजवळ जाऊन तिनें त्याला नमस्कार केला व त्याला त्याच्या मित्राचें नांव विचारलें व त्याच-प्रमाणें त्या फुलाबद्दलहि चौकशी केली.

## २३

भारतीय युद्ध संपल्यावर प्रत्यक्ष श्रीकृष्णानीं धर्मराजास राज्याभिषेक केला. युधिष्ठिरानें नंतर अत्यंत नीतीनें हस्तिनापुरांत राज्य केलें. प्रजा अत्यंत सुखी झाली व राज्यांत जिकडे तिकडे आनंद पसरला. अशा रीतीनें पुष्कळ दिवस

राज्य केल्यावर धर्म आपले बंधु व द्रौपदी यांसह स्वर्गलोकास जाण्यास निघाला. निघण्यापूर्वी अभिमन्यूचा मुलगा परीक्षित् यास त्यानें राज्यावर बसविलें. स्वर्गाची वाट चालत असतां एक कुत्रेंहि धर्माच्या पाठीमागून चालत होतें. वाटेंत चारी भाऊ व द्रौपदी मरून पडली तेव्हां धर्मराज व तो कुत्रा असे दोघे स्वर्गाच्या दारापर्यंत जाऊन पोंचले. स्वर्गाच्या दारावर यम पहारा करीत होता. तो कुत्र्याला आंत घेईना. तेव्हां धर्मराज त्याला आपलें अर्धें पुण्य देण्यास तयार झाला. तेव्हां यम म्हणाला की, तुझें सत्त्व पाहण्याकरिता मींच कुत्र्याचें रूप घेतलें होतें. धर्मराज स्वर्गांत गेला. तेथें त्याला सर्व कौरव आनंदानें सुख भोगीत असलेले दिसले परंतु पांडव दिसले नाहीत. तेव्हां यमानें सांगितलें कीं, कौरवांना रणाङ्गणावर मृत्यु आला म्हणून ते स्वर्गसुख भोगीत आहेत. तुझे बंधु युद्धांत मेले नाहींत. म्हणून त्यांनीं जें कांहीं पाप केलें असेल त्याचें फळ नरकांत भोगीपर्यंत ते स्वर्गांत येणार नाहीत.

## २४

फार प्राचीन काळी देव व दानव यांमध्यें एक मोठें युद्ध झालें. त्यांत देवांचा जय झाल्यामुळें त्यांना गर्व चढला व ते म्हणूं लागले कीं आम्ही आमच्या मोठ्या सामर्थ्यामुळें विजयी झालों. इतक्यांत त्यांचेपुढें एक अत्यंत तेजस्वी प्राणी येऊन उभा राहिला. तेव्हां देवांनीं अग्नीला तो कोण आहे हें शोधून येण्यास सांगितलें. अग्नि त्या प्राण्याजवळ गेला तेव्हां त्यानें तूं कोण आहेस असें अग्नीला विचारलें. 'मी अग्नि आहें' असें त्यानें सांगितल्यावर 'ही गवताची काडी जाळ' असें त्यानें त्याला सांगितलें. कितीहि प्रयत्न केला तरी अग्नीला गवताची काडी जाळतां आली नाहीं. त्याचप्रमाणें वायूनें जरी मोठी वावटळ उत्पन्न केली तरी त्याला ती काडी जाग्यावरून हालवतां आली नाहीं. शेवटी सर्व देवानीं आपला राजा जो इन्द्र त्याला तो प्राणी कोण आहे हें पाहून येण्यास सांगितलें. इन्द्र जवळ जातो तोंच तो प्राणी अदृश्य झाला, व त्याचे जागी उमा देवीची तेजस्वी आकृति दिसूं लागली. इन्द्रानें तिला विचारल्यावर ती म्हणाली, 'तो परब्रह्म होय. तोच सर्वश्रेष्ठ परमेश्वर व त्याचेच कृपेनें तुम्हांला जय मिळाला. त्याचेच सामर्थ्यानें चन्द्रसूर्यांना तेज मिळतें, अग्नि तेजस्वी होतो व वायु शक्तिमान् होतो.' अशा रीतीनें इन्द्रादि देवांस परमेश्वराचें ज्ञान झालें.

## २५

एके दिवशी दुर्वास ऋषि आपल्या शिष्यांचा मोठा जमाव बरोबर घेऊन दुर्योधनाच्या दरबारांत आले. त्यांस पाहतांच दुर्योधनानें सामोरें जाऊन त्यांचा उत्तम सत्कार केला. तेव्हां दुर्वास ऋषि संतुष्ट झाले व त्यांनीं राजास वर मागण्यास सांगितलें. शकुनि व कर्ण यांच्या शिकवणीवरून राजा म्हणाला, 'मुनिवर्यांनी आपल्या असंख्य शिष्यांसह वनांत राहणाऱ्या पांडवांकडे एकदम रात्रीं जावें व भोजन मागून पांडवाचें सत्त्व हरण करावें.' दुर्वासानीं तें कबूल केलें व पाण्डवांचें जेवण आटोपून द्रौपदी विश्रांति घेत असतां ते आपल्या दहा हजार शिष्यांसह तेथें गेले! पांडवांनीं त्यांचा चांगल्या रीतीनें सत्कार केला. 'आम्ही स्नान करून येतों तोपर्यंत भोजनाची तयारी ठेवा' असें सांगून ऋषि शिष्यांसह नदीवर गेले. एवढ्या लोकांना रात्रीच्या वेळी कसें जेवावयास घालावें असा पाण्डवांना प्रश्न पडला. तेव्हां द्रौपदीनें श्रीकृष्णाची मदतीकरितां मनापासून प्रार्थना केली. प्रार्थना ऐकून श्रीकृष्ण तेथें आले व त्यांनीं द्रौपदीला सर्व वस्तु पुरविल्या. जेवण तयार करून ती ऋषींची वाट पाहत बसली. परंतु ऋषि व शिष्य यांचे पूर्वींच पोट भरलें म्हणून ते तसेच पळून गेले!

## २६

प्राचीन काळीं गांधार शहरामध्यें मोठा पराक्रमी व सम्पत्तिमान् सुबळ नांवाचा राजा राहत होता. तो प्रजेचे प्रेमानें पालन करी. त्याला शकुनि नांवाचा मुलगा व गांधारी नांवाची मुलगी होती. शकुनि जात्या कपटी व लबाड तर गांधारी उदार, धर्मशील व खरें बोलणारी होती. आईबापांची आज्ञा ती कधींही मोडीत नसे. तिचें लग्नाचें वय झालें तेव्हां सुबळ राजा योग्य राजपुत्राचा शोध करूं लागला. इतक्यांत भीष्माचार्यांकडून एक दूत आला व त्यानें त्यास एक पत्र दिलें. त्यांत त्यांनीं धृतराष्ट्राकरितां गांधारीची मागणी घातली होती. सुबळ राजाला ही गोष्ट पसंत पडली. त्याला धृतराष्ट्र आंधळा आहे हें माहीत होतें, परंतु डोळे असलेल्या दुर्गुणी राजपुत्रापेक्षां आंधळा सद्गुणी राजपुत्र अधिक चांगला असा त्यानें विचार केला. आपल्यास आंधळा नवरा मिळणार हें ऐकून गांधारीला प्रथम वाईट वाटलें. परंतु वडिलांच्या इच्छेला मान देण्याचा तिनें

निश्चय केला. लग्न ठरल्याबरोबर तिनें एका कापडाच्या पट्टीनें आपले डोळे बांधले. कारण आपल्या पतीला जें सुख नाहीं तें आपण उपभोगणें योग्य नाहीं असें तिनें ठरविलें व मरेपर्यंत डोळ्यावरचें आवरण दूर केलें नाहीं! यावरून तिच्या थोर व पवित्र मनाची आणि पतिनिष्ठेची कल्पना येते.

## २७

देवांचा असुरांनीं पुष्कळ वेळां पराजय केला. तेव्हां इन्द्रादि सर्व देव ब्रह्मलोकाला जाऊन ब्रह्मदेवाला आपली दुःस्थिति सांगते झाले. तेव्हां ब्रह्मदेव सर्व देवांना घेऊन क्षीरसागरनिवासी विष्णूकडे गेले व त्यांनीं सर्व वृत्तान्त श्रीविष्णूला सांगितला. तेव्हां तो म्हणाला, ' क्षीरसागरांत मन्दर पर्वताला ठेवून त्याचा रवीप्रमाणें उपयोग करा व सर्पाचा राजा वासुकि याला घुसळण्याची दोरी बनवा व राक्षसांशीं तह करून सर्वजण क्षीरसागराचें मंथन करा. पुष्कळ वेळपर्यंत जरी फळ मिळालें नाहीं तरी अधीर होऊं नका. समुद्रांतून काळकूट आदिकरून विघ्नें उत्पन्न होतील. त्यांना भिऊं नका. शेवटीं अमृत बाहेर येईल. त्या वेळीं असुरांना कपटानें फसवून मी तें तुम्हांला देईन. ' विष्णूचें हें भाषण ऐकून सर्व देव निघून गेले. इन्द्रानें हा सर्व बेत दानवांचा राजा बलि याला कळविला व तो त्याला पसंत पडला. तेव्हां देवदानवांनीं विष्णूनें सांगितल्याप्रमाणें सर्व केलें. कामधेनु, कल्पवृक्ष, पारिजात इत्यादि वस्तु पहिल्यानें बाहेर आल्या. शेवटीं अमृतानें भरलेला सुवर्णकलश घेऊन धन्वन्तरि वर आला. तो कलश राक्षसांनीं पळविला व ते आपसांत भांडूं लागले. तेव्हां विष्णूनें सुंदर स्त्रीचें रूप घेतलें व दानवांजवळून कलश घेतला व त्यांना फसवून तें अमृत देवांना दिलें.

## २८

दुष्यन्तानें शकुन्तलेचा तिरस्कार करून स्वीकार केला नाहीं. त्या वेळीं ती परत जात असतां मध्येंच तिला तिची आई मेनका हिनें नेलें व मारीच ऋषींच्या आश्रमांत ठेविलें. योग्य वेळीं ती प्रसूत होऊन तिला चक्रवर्ति लक्षणांनीं युक्त असा पुत्र झाला. तो हिंस्र पशूंशींहि निर्भयतेनें खेळे, म्हणून मारीच ऋषींनीं

त्याचें सर्वदमन असें नांव ठेविलें. इतक्यांत दानवांचा पराभव करून दुष्यन्त परत येत असता त्याला मारीच ऋषींचा आश्रम दिसला. ऋषींच्या दर्शनाच्या इच्छेनें राजा आंत शिरतो तोंच त्याला सिंहाच्या छाव्याबरोबर खेळणारा एक लहान मुलगा दिसला. त्याला पाहतांच राजाचें मन त्याचेकडे ओढलें गेलें व त्याला जवळ घेऊन राजा त्याला कुरवाळूं लागला. तेव्हां त्याला त्याच्या हातावर सार्वभौमत्वाची चिन्हें दिसलीं. ऋषींनी पूर्वी दिलेल्या आशीर्वादाची आठवण होऊन त्या मुलाबद्दल त्याला प्रेम वाटूं लागलें. इतक्यांत त्या मुलाच्या हातांतील ताईत खालीं पडला. तेव्हां राजा तो वर उचलणार इतक्यांत जवळ असणारी तापसी म्हणाली, "अहो महाराज, आपण तो उचलूं नका; कारण या मुलाच्या आईबापांशिवाय इतर कोणी उचलला तर त्याचा साप होऊन तो डसतो ?" तरी सुद्धां दुष्यन्तानें तो उचलला परंतु त्याला कांहीं झालें नाही. तेव्हां तो मुलगा आपलाच आहे अशी त्याची खात्री पटली.

## २९

निषध देशच्या नल राजाचा मुलगा इंद्रसेन याला पुष्कळ बायका असून सुद्धां मुलगा नव्हता. म्हणून पुरोहितांचे सल्ल्यानें त्यानें 'पुत्रकामेष्टि' यज्ञ केला. त्या यज्ञप्रभावानें काही दिवसानीं त्याची ज्येष्ठ भार्या गरोदर राहिली व योग्य वेळीं तिला मुलगा झाला. चन्द्राप्रमाणें दिसणाऱ्या त्या मुलाचें चन्द्राङ्गद असें नांव ठेवलें. अकराव्या वर्षी त्याचें उपनयन झालें व त्यानें निरनिराळ्या विद्यांचें अध्ययन केलें. त्याचे सर्व गुण त्याचा आजा नल याच्याप्रमाणें होते. सीमन्तिनीचा बाप चित्रवर्मा हा तिच्याकरितां योग्य वर शोधीत होता. त्याचे कानी चन्द्राङ्गदाची कीर्ति गेली. म्हणून त्यानें इन्द्रसेनाकडे निरोप पाठविला की, 'आपल्या मुलाला मी माझी मुलगी देऊं इच्छितो.' इन्द्रसेनानें, 'सर्व स्त्रियांना अलंकाराप्रमाणें असणारी सीमन्तिनी आपली सून करतों' असें कबूल केलें. हें ऐकून आनन्दित झालेल्या चित्रवर्म्यानें विवाहाकरितां शुभ मुहूर्त ठरविला व इन्द्रसेनाला त्याप्रमाणें कळविलें. म्हणून मुलगा, स्त्रिया व सोयरे यांसह इन्द्रसेन चित्रवर्म्याच्या राजधानींत आला. राजानें त्या सर्वांचा योग्य रीतीनें सन्मान केला, व योग्य मुहूर्तावर चन्द्राङ्गद व सीमन्तिनी यांचा विवाह झाला.

# ३०

एकदां रामचंद्र सभेंत बसले असतां त्यांनीं कुत्र्याचा आर्त स्वर ऐकला. त्याबरोबर 'हा कुत्रा का रडत आहे तें पहा' असा रामानें आपल्या दूतांस हुकूम केला. दूतानीं त्या कुत्र्यास हांकून दिले. पुन्हां दुसऱ्या दिवशी तो कुत्रा राजसभेजवळ रडूं लागला. तेव्हांहि त्याला दूतांनी हांकून दिलें. तिसऱ्या दिवशीं तो कुत्रा पुन्हां ओरडूं लागतांच रामानें दूतांना त्या कुत्र्याला सभेंत घेऊन येण्याची आज्ञा केली. कुत्र्याला रामाचा निरोप कळतांच तो म्हणाला, 'मी अमंगळ योनीत उत्पन्न झालों आहें, मला राजसभेसारख्या ठिकाणीं येतां येणार नाहीं.' कुत्र्याचें हें उत्तर ऐकून श्रीराम स्वतः लक्ष्मणासह सभेबाहेर आले व त्यांनीं त्या कुत्र्याला दुःखाचें कारण विचारलें. तेव्हां तो म्हणाला, 'हे दयाघना, तुमचे माझ्यावर फार उपकार आहेत. मला निरपराध्याला एका यतीनें दगडानें मारलें, त्यामुळे माझा पाय मोडला. त्यामुळे दुःखी होऊन मी आपल्या जवळ आलों आहें.' तेव्हां रामानें यतीला दगड मारण्याचें कारण विचारलें. यति म्हणाला, 'राजा, मी भिक्षेकरिता हिंडत असतां या श्वानानें मला स्पर्श केला व माझी भिक्षा भ्रष्ट केली, म्हणून रागानें मी याला मारलें.' रामानें हें ऐकून त्याला म्हटलें, 'श्वानानें विचारशक्ति नसल्यामुळें तसें वर्तन केलें. त्याला तुम्हीं मारले, हा तुमचा अपराध आहे. माझ्या राज्यांत कोणालाहि दुःख होतां कामा नये.'

---

# विस्तृत टीपा

१ वचन देणें—प्रति + श्रु ५ प. ( ज्याला वचन द्यावयाचें त्याची चतुर्थी )। व्रत पाळणें—व्रतम् अनु + स्था (१ प.)। विवाह करणें—परि + नी ( १ उ. )। पूर्वीच—पूर्वमेव, आदावेव। मधला—मध्यम ( वि. )। गादीवर वसणें—सिंहासनम् आ+रुह् (१ प.)। त्याला भीष्म असे लोक म्हणूं लागले—लोके सः भीष्मः इति ख्यातः अभवत्।

२ पसरली होती—प्रसृता, प्रकाशतां गता। गाडीवाला—शाकटिकः। सर्वांत श्रेष्ठ......गोष्ट-श्रेष्ठम्-उत्तमम् ज्ञानम्। माहिती—वृत्तम्। शोधीत निघाला—अन्विष्यन्नेव प्रतस्थे। तपास करणें—अनु + इष् ( ४ प. )। गाडीखाली वसलेला—शकटस्य अधः उपविष्टः। ६००—षट्शतम्। सेवा करणें—उप + स्था ( १ आ. ); सेव् ( १ आ. )। तो कबूल झाला नाही—तेन एतद् न अङ्गीकृतम्, एतद् तस्य न सम्मतम्। खेडें—ग्रामः।

३ कीर्ति कानीं गेली—कीर्तिः श्रवणपथम् गता-अवतीर्णा। पाठवणें—वि + सृज् ( ६ प. ), प्र + हि ( ५ प. ), प्र + इष् ( प्र. )। गोंधळून जाणें—व्याकुलितचित्ता भू, पर्याकुलमनाः भू। निभावून नेणें—रक्ष् ( १ प. ), त्रै ( १ आ. ), अव् ( १ प. )। अशा विश्वासानें—इति विश्वस्य-श्रद्धाय। शेवटचें—अन्तिम, चरम ( वि. )। विनंति—प्रार्थना। अतिशय काकुळतीनें—अतीव सकरुणम्। तिचा प्राण गेला—सा परासुः अभवत्, सा पञ्चत्वं गता। मन पालटलें—तस्य मनसि परिवर्तनम् अभवत्। दुष्टपणा—दुष्टत्वम्, खलता, पैशुन्यम्।

४ भयंकर दिसणारी—भीषणाकृतिः, घोरदर्शना। हडळ—पिशाची। त्याच्यावर धावून आली—तम् अभ्यद्रवत्-अभ्य-

धावत् । बेढब आकाराची—विरूपदर्शना-विरूपाकृतिः । घाबरणें—भी (३ प.), भयेन वेप्-कम्प् (१ आ.)। लोळूं लागली—लुठितुं प्रारभत । किळसवाणी स्थिति—बीभत्सावस्था, दुरवस्था, दुर्गतिः । मार्ग सांगा—मार्गम् उपदिशतु भवान्-शास्तु भवान् । आश्चर्य वाटले—विस्मितः अभवत् ।

५ अतिशय दाट काळोख्या रात्रीं—रात्रौ घनीभूते अन्धकारे-निबिडे तमसि । बंगला—हर्म्यम् । आवार—प्राङ्गणम् । चालला होता—आक्राम्यत् । दिवा—दीपः । तो अर्धा........ इतक्यांत—यावत् सः अर्धमार्गम् आक्राम्यति तावत् । त्याला भास झाला—सः अमन्यत, तस्य मनसि संशयः उत्पन्नः । कांपणें—कम्प्-वेप् (१ आ.)। धांवा करणें—ध्यै (१ प.), चिन्त् (१० उ.)। चावणें—दंश् (१ प.-दशति)। धीर येणें—सम्+आ+श्वस् (२ प.)। खात्री करून घेतल्यावर—निश्चित्य । शेजारचे लोक—प्रातिवेश्याः, प्रातिवेशिकाः । हांका मारणें—आ + ह्वे (१ प)। दावणें—मृद् (९ प.).

६ परीट—रजकः । गाढव—रासभः, गर्दभः । अवजड गड्डा—गुरुभारः । त्याला पाठीवरून न्यावे लागत असत—(गुरूणां वस्त्रभाराणा) पृष्ठेन वहनं तस्य आवश्यकम् अभवत् । त्याच्या आंगावर वाघाचे कातडें घालून—व्याघ्रचर्मणा तस्य शरीरम् आच्छाद्य । जवळचें शेत—समीपवर्ति क्षेत्रम् । क्रम चालला—क्रमः प्रावर्तत । काळसर घोंगडी—कृष्णवर्णः कम्बलः । शरीराभोंवती ... ... गुंडाळणें—सः कृष्णवर्णेन कम्बलेन शरीरं प्रावृणोत् । डोकें लववून—शीर्षम् अवनमय्य । धनुष्यबाण—धनुष्काण्डम् । भरपूर खाणें—अन्न-प्राचुर्यम् । लठ्ठ—पीवरः, पीनः । गाढवी—गर्दभी ।

७ जन्मल्याबरोबर—जातमात्रं तं (यमुनाया प्राक्षिपत्)। अनाथ—निराधार (पुं.), अनाथ (वि.)। बालक वाहत असतां—जलप्रवाहेण उह्यमानः बालः (सारथिना लब्धः)। मूलबाळ—

**अपत्यम्** । पोटचा मुलगा—**औरसः पुत्रः** । लहानपण—**शैशवम्, बाल्यम्** । प्रेम जडलें—**प्रेमभावः निबद्धः** । शिवाय— **अन्यच्च, अपरं च** । सल्ला— **मन्त्रः** । विलक्षण—**असामान्य** ( वि. ) । **अपूर्व** ( वि. ) । विशिष्ट गोष्ट— **व्यतिकरः-विशेषः** ।

८ अशी बातमी पसरली—**एतादृशी वार्ता प्रसृता-प्रकाशतां गता** । अवेळ—**अकालः** । दुसरा......वाजवीत असावा—**केनापि अन्येन घण्टायाः वादयित्रा भाव्यम्** । अशी खात्री करून घेतली—**सा आत्मानम् प्रत्याययत्** । बंदोबस्त करणें—**दण्ड्, नश्** ( प्र. ) । बंद होणें—**वि+रम्** ( १ प. ) ।

९ त्याला सर्वत्र...दिसूं लागला— **सः अखिलं जगत् ईश्वरमयम् अपश्यत्-अमन्यत** । पाठीमागून जाणें—**अनु+सृ- गम्** ( १ प. ) । प्रत्युत्तर—**प्रतिवचनम्** ।

१० तत्त्ववेत्ता—**तत्त्वविद्, तत्त्वज्ञः** । सल्ला घेणें—**मन्त्र्** ( १० आ. ) । सुखापेक्षां...किंमत देत असे—**सुखात्सद्गुणः श्रेयान् इति सः अमन्यत** । अडचण—**विपद्** । शहाणपणा—**चातुर्यम्** । लोक-निन्दा—**लोकापवादः** । अलिप्त—**मुक्त** ( वि. ) । चिखलाचें पाणी —**कर्दमयुक्तं-पङ्किलं जलम्** । ओतणें—**वृष्** ( १ प. ), **प्र+क्षिप्** ( ६ उ. ) । थोडासा—**अल्पांशेन, स्तोकांशेन** ।

११ चोऱ्या करून उपजीविका करीत असे—**चौर्येण वृत्तिम् अकरोत्** । पुढें उभें करणें—( कस्यापि ) **पुरतः स्थापय** । न्यायाधीश—**न्यायाध्यक्षः** । गुन्हा—**अपराधः** । गंभीरपणें—**सगाम्भीर्यम्** । भिंत—**भित्तिः** ( स्त्री. ) । भोक पाडणें— **विवरं कृ-निर्मा** ( ३ आ. ) । पळविणें—**अप+हृ** ( १ उ. प. ) । शिक्षा करणें—**दण्ड्** ( १० उ. प. ) । निरपराधी—**निरपराध-निरागस्-निरागस्क** ( वि. ) । शांतपणें—**शान्तचित्तेन** । खरें मानणें—**श्रत्+धा** ( ३ उ. ), **वि+श्वस्** ( २ प. ), **प्रति+ इ** ( २ प. ) । तुझें...

पश्चात्ताप होणें—**अनु+तप्** ( १ प. ) । चुकी—**प्रमादः, अज्ञानम्** । कबूल करणें—**प्रति+पद्** ( ४ आ. ) ।

१४ पाहात पाहात—**क्रमशः-शनैः शनैः पश्यन्** । दुपार—**मध्याह्नः** । क्रीडा करणें—**वि+हृ** ( १ उ. ), **रम्** ( १ आ. ) । अडविणें—**प्रति+रुध्** ( ७ उ. ) । पोहोंचलें—**प्राप्तम्** । पाण्याबरोबर दूर गेलेलीं—**जलप्रवाहेन सुदूरं नीतानि** ( पुष्पाणि ) । ओळखणें—**अभि+ज्ञा-ज्ञा** ( ९ उ. ) । आव्हान देणें—**आ+ह्वे**-( १ आ. ) । तडाखा—**प्रहारः** । छाती—**वक्षस्, उरस्** ( न. ) ।

१५ दुष्काळ—**दुर्भिक्षम्, अनावृष्टिः** । पडणें ( दुष्काळ )—**आ+पत्** ( १ प. ) । मिळेनासें झालें—**दुर्लभम् अभवत्** । मुंग्यांसारखें—**पिपीलिकावत्—पिपीलिका इव** । अधिकारी—**राजपुरुषः** ( पुं. ) । सरकारी कोठार—**राजकोषागारम्** । सांठविलेलें—**सञ्चितम्** । इतराजी होणें—**अवकृपापात्रं भू** । तरी चालेल......परंतु बरें नाहीं—**वरं......न पुनः** । वाटणें—**वि+भज्** ( १ उ. ) । पकडून आणणें—**बन्दीग्राहम् आ+नी** ( १ उ. ) । तयार—**उद्यत** ( वि. ) । जाण्यापूर्वी—**गमनात् प्राक्-पूर्वम्** । परवानगी—**अनुज्ञा** । मागणें—**प्र+अर्थ्** ( १० आ. ) । वेष घेणें—**रूपं ग्रह्** ( ९ उ. ) । बादशहा—**महाराजः, अधिराजः** । किंमत—**मूल्यम्** । हुकूम पाठविणें—**आज्ञापत्रं वि+सृज्** ( ६ प. )-**प्र+हि** ( ५ प. ) ।

१६ नगरींत राज्य करणें—**नगरीं शास्** ( २ प. ) । बोलावणें—**आ+ह्वे** ( १ प. ) । अपमान करणें—**अव+मन्** ( ४ आ. ) । सूड उगविणें—**वैरनिर्यातनं कृ** । नायनाट करणें—**समूलघातं हन्** ( २ प. ) । प्रधान—**सचिवः** । राजाच्या पदरी—**राज्ञः अधिकारिमण्डले** । परत मिळविणें—**पुनर् लभ्** ( १ आ. ) । आटोकाट प्रयत्न करणें—**भगीरथवत् प्रयत्** ( १ आ. ) । बळकटी आणणें—**प्रबलतां नी** ( १ उ. ) । खटपट—**प्रयासः** । कारस्थानी—**मायावी** । सहजासहजीं—**अनायासेन, सौकर्येण** । मृत्यूबद्दल—

वधम् अन्तरेण । फायदा घेणें—आत्महिताय उप+युज् ( ७ आ. ) । चाल करून जाणें—अभि+गम् ( १ प. ) ।

२७ मन लागलें होतें—तस्य मनः बद्धम् आसीत् । निरोप—सन्देशः । कादम्बरीला करमत नाही—कादम्बर्याः मनः कस्मिन्नपि न रमते–कादम्बरी रतिं न लभते । आपल्यावाचून—भवन्तम् अन्तरेण–विना । कबूल करणें—प्रति+श्रु ( ५ प. ) । धीरगम्भीर स्वभावाचा—प्रकृतिगम्भीरः, निसर्गधीरः । माझी चूक झाली—मया प्रमादः कृतः । पराकाष्ठा करणें—यावच्छक्यं प्रयत् ( १ आ. ) । फार काय—किं बहुना । पर्वा करणें—तृणाय मन् ( ४ आ. ) । द्विधा वृत्ति झाली—कार्यद्वयाकुलम् अभवत् ( मनः ), द्वैधीभावकातरम् अभवत् ( मनः ) । एकीकडे—एकतः । दुसरीकडे—अन्यतः । एकीकडे......लागलेली—एकतः मातृसन्देशस्य अनुल्लङ्घनीयता अन्यतः तु कादम्बरीं प्रति मनसः आकर्षणम् ।

२८ गवळी—गोपः । उपकार मानणें—उपकारं–अनुग्रहं प्रति-पद् ( ४ आ. ) । चांगला पाऊस पडल्याबद्दल—सुवृष्टिम् अन्तरेण । तयारी—सम्भाराः । हित करणारी—हितकरी । बेत बदलणें—मनीषां परि+वृत् ( प्र. ) । सुरू करणें—प्र+वृत् ( प्र. ) । मुसळधार पाऊस—आबद्धधारः पर्जन्यः । बुडणें—नि+मस्ज् ( ६ प. ) । आधार—गतिः, आश्रयः । कृष्णाच्या......चालत नाहीं—कृष्णसामर्थ्यस्य आत्मनः शक्तिः न स्तोकांशेनापि प्रभवति । थांबविणें—वि+रम् ( प्र. ) ।

२९ वेष पालटणें—वेषपरिवर्तनं वि+धा ( ३ उ. ) । कर्मधर्मसंयोगानें—यदृच्छया । दानधर्म करणें—द्रव्यप्रदानेन धर्मम् आचर् ( १ प. ) । संधि साधून—कालानुकूल्यं ज्ञात्वा । ठेव—निक्षेपः, न्यासः । माझी बहीण......ठेवून घे—इमां मद्भगिनीं न्यासीकृतां स्वीकरोतु अत्रभवती । शब्द खरा करणें—वचनं सार्थतां नी । मान्य करणें—अनु+मन् ( ४ आ. ) । हिला

मैत्रिणीप्रमाणें वागवीन—**अनया सह अहं सखीवत् व्यवहरिष्यामि**। काळजी करूं नका—**वीतचिन्तः भव, निश्चिन्तः भव**। पुढील—**भाविन्** ( वि. )।

२० तोडणें—**लू** ( ९ उ. )। नांव ठेवणें—**नाम कृ** ( ८ उ. )। कळी—**मञ्जरी**। नको नको म्हणत असतांनाहि—**मा मेति व्याहरतः अपि तस्य**। कानावर ठेवणें—**कर्णे कृ** ( ८ उ. )। वेधून घेणें—**आ+कृष्** ( १ प. )।

२१ विराटाच्या नोकरींत पाण्डव असतां—**विराटं सेवमानेषु पाण्डवेषु**। दासी म्हणून—**दासीभावेन**। कीचकाचें तिच्यावर मन गेलें—**कीचकः तस्यां बद्धानुरागः जातः**। छळणें—**अर्द्** ( १ प., १० उ. ), **पीड्** ( १० उ. )। भीमाशिवाय—**भीमात् ऋते**। पांघरूण घेऊन—( आत्मानम् ) **वस्त्रेण आच्छाद्य**। एकमेकांची—**परस्परम्**।

२२ मोठ्या पहाटेस—**महति प्रत्यूषे**। पूर्वी न मिळालेला—**अप्राप्तपूर्वः, अपूर्वः**। उत्सुकता—**जिज्ञासा, कुतूहलम्**। मागें टाकून—**पृष्ठतः विहाय**। ध्यानस्थ—**ध्यानमग्नः**। मदनाला मागें टाकणारें—**मदनम् अपि अतिशयानम्** ( सौन्दर्यम् )। चौकशी करणें—**वृत्तं प्रच्छ्** ( ६ प. )।

२३ प्रत्यक्ष—**स्वयमेव**। राज्याभिषेक करणें—**राज्ये अभि + सिच्** ( ६ उ. )। राज्य करणें—**शास्** ( २ प. )। नीतीनें—**नयेन**। निघण्यापूर्वी—**निर्गमनात् प्राक्**। पहारा करणें—**रक्षकवत् स्था** ( १ प. )। तो कुत्र्याला आंत घेईना—**कुक्कुरस्य अन्तः प्रवेशः तस्य न सम्मतः**। सत्त्व पाहणें—**परि+ईक्ष्** ( १ आ. )।

२४ गर्व चढला—**गर्वम् अवहन्, गर्विताः जाताः**। जाळणें—**दह्** ( १ प. )। कितीहि प्रयत्न केले तरी—**कियतापि प्रयत्नेन**। वावटळ—**प्रभञ्जनः**।

२५ शिष्यांचा मोठा समूह—**महाशिष्यपरिवारः**। सामोरा जाणें—**प्रति+उद्+गम्** ( १ प )। उत्तम सत्कार करणें—**उच्चसत्कारेण सम्मानय**। वर मागणें—**वरं वरय-वृ** ( १ प. )। शिकवणी—

उपदेशः । वनात राहणारा—वनौकस् (वि.)। जेवण आटोपून—भोजनं समाप्य । जेवावयाला घालणें—भुज् (प्र.)। मनापासून—सर्वात्मना । पुरवणें—दा (१ प., ३ उ.)। तयार—सिद्ध (वि.)। वाट पाहणें—प्रति + ईक्ष् (१ आ.)-प्रति + पालय ।

२६ लबाड—शठः । लग्नाचें वय होणें—विवाहवयोऽवस्थां स्पृश-प्राप् । मागणी घालणें—वृ (१० उ.-वरयति-ते)। मान देणें—(पितुः इच्छां) शिरसा मन् (प्र.)। बांधणें—आ + वृ (५ उ.)। मरेपर्यंत—आमरणम् (अ.)। कल्पना येणें—ज्ञातुं शक् (५ प.)। पतिनिष्ठेची कल्पना येते—तस्याः प्रतिनिष्ठा ज्ञातुं शक्यते ।

२७ पुष्कळ वेळा—असकृत् (अ.), बहुवारम् (अ.)। रवी—मन्थनदण्डः, मन्थानः। उपयोग करणें—उप+युज् (७ आ.) तह—सन्धिः । फसवणें—वञ्च् (१० आ.)। आपापल्या ठिकाणीं—स्वं स्वं स्थानम् । कळविणें नि + विद् (प्र.)। पसंत पडणें—सम्मतः भू (१ प.)। भांडूं लागले—कलहं कर्तुं प्रारभन्त।

२८ तिरस्कार करणें—प्रत्या+ख्या (२ प.)। निर्भयतेनें—निःशङ्कम् । दर्शनाची इच्छा—दिदृक्षा । छावा—शावकः । कुरवाळणें—लल् (प्र.)। आठवण होणें—स्मृ (१ प.)। ताईत—रक्षाकरण्डकः। डसणें—दंश् (१ प. दशति)। खात्री पटली—विश्वासः उत्पन्नः ।

२९ पुष्कळ बायका असून मुद्धा—बहुपत्नीकस्य अपि (इन्द्रसेनस्य)। गरोदर—गर्भिणी, आपन्नसत्त्वा, अन्तर्वत्नी कन्या देणें—कन्यां प्र+दा (३ उ.)। अलंकाराप्रमाणें असणारी—(रमणी) ललामभूता । सून—स्नुषा ।

३० हुकूम करणें—आ+दिश् (६ उ.)—आज्ञापय। हाकून देणें—निस्+सृ (प्र.)। अमंगळ—पापमयी (योनिः)। भ्रष्ट—अपवित्र (वि)।

# परिशिष्ट

## ( वाक्यांतील शब्द जोडण्यास उपयुक्त सन्धिनियम )



### स्वरसन्धि

१ अ – आ, इ – ई, उ – ऊ, ऋ–ॠ हे सजातीय स्वर एकमेकांपुढें आले असतां त्या दोहोंबद्दल दीर्घ स्वर येतो. जसें—वेगेन + आगमनम्—वेगेनागमनम्। रक्षति + ईश्वरः–रक्षतीश्वरः। अश्रु + उद्भवति—अश्रूद्भवति।

२ अन्त्य अ किंवा आ यांपुढे इ – ई, उ – ऊ, ऋ – ॠ, व ऌ हे स्वर आले असतां दोन्ही स्वरांबद्दल अनुक्रमें गुणरूपी फरक होतो, म्हणजे ए, ओ, अर् व अल् असे अनुक्रमें फरक होतात. जसें—नयनेन + ईक्षते—नयनेनेक्षते। सेवया+ऋणं – सेवयर्णम् किंवा * सेवय ऋणम्।

३ शब्दाच्या अन्त्य अ – आ पुढें ए – ऐ व ओ – औ हे स्वर आले तर दोहोंबद्दल अनुक्रमें ऐ व औ असा फरक होतो. जसें—इन्द्रस्य + ऐरावतः—इन्द्रस्यै...।

४ इ – ई, उ – ऊ, ऋ – ॠ व ऌ यांपुढें विजातीय स्वर आल्यास त्यांचा अनुक्रमें, य्, व्, र् व ल् होतो व त्यांत पुढील स्वर मिळून पूर्णाक्षर होतें. जसें—गच्छति + एकः—गच्छत्येकः। वस्तु + एतद् – वस्त्वेतद्।

५ कोणत्याहि शब्दाच्या द्विवचनी रूपाच्या शेवटीं 'ई, ऊ व ए' हे स्वर आले तर त्यांचा पुढें येणाऱ्या स्वराशीं सन्धि होत नाहीं. त्याचप्रमाणें **अमी** या अदस् सर्वनामाच्या रूपापुढें स्वर आल्यास सन्धि होत नाहीं. जसें—पुष्पे + ईक्षते। अमी + ईशाः। गुरू + आगच्छतः।

---

***टीपः**—ऱ्हस्व ऋच्या पूर्वी ए, ऐ, ओ, औ यांशिवाय कोणताहि स्वर आल्यास 'ऋ' चा २ ऱ्या नियमाप्रमाणें 'सन्धि' करावा किंवा न करतां मागील स्वर दीर्घ असल्यास ऱ्हस्व करावा.

६ शब्दाच्या द्विवचनी रूपाशिवाय इतर रूपाच्या शेवटील ‘ ए ’ या स्वरापुढें ‘ अ ’ हा स्वर आल्यास, ‘ अ ’ चा लोप होतो व त्याचे जागी ऽ असें चिन्ह ( अवग्रह ) लिहितात व त्याचा उच्चार करीत नाहींत. जसें—**वने** **अस्ति**–**वनेऽस्ति**।

७ शब्दाच्या द्विवचनान्त रूपाशिवाय इतर रूपांशेवटीं ‘ ए ’ हा स्वर आल्यास व पुढें ‘ अ ’ शिवाय इतर स्वर आल्यास ‘ ए ’ चा ‘ अय् ’ असा फरक होतो; आणि त्यांतील ‘ य् ’ पुढील स्वरांत मिळून पूर्णाक्षर होतें किंवा ‘ य् ’ चा लोप होतो व त्यामुळें एकमेकांपुढें येणाऱ्या दोन स्वराचा सन्धि होत नाही. जसें—**वने ऋषिः**–**वनयृषिः**–**वन ऋषिः** ।

८ शब्दाच्या शेवटी ‘ ओ ’ हा स्वर असून त्याचे पुढें ‘ अ ’ हा स्वर आला तर ‘ अ ’ चा लोप होतो व त्याच्या जागीं ऽ असें चिन्ह ( अवग्रह ) लिहितात व त्याचा उच्चार करीत नाहींत जसें—**प्रभो अत्र प्रभोऽत्र**-* **प्रभो अत्र** ।

९ शब्दाच्या शेवटीं ‘ ओ ’ असून त्याचेपुढे ‘ अ ’ शिवाय स्वर आला तर ‘ ओ ’ चा ‘ अव् ’ होतो. आणि ‘ व् ’ पुढील स्वरांत मिळून पूर्णाक्षर होतें किंवा ‘ व् ’ चा लोप होतो. जसें—**प्रभो**–**इह**–**प्रभविह**–**प्रभ इह**– * **प्रभो इह** ।

१० शब्दाच्या शेवटीं ‘ ऐ व औ ’ हे स्वर असून त्यांचेपुढे जर कोणताहि स्वर आला तर त्यांचा अनुक्रमें ‘ आय् व आव् ’ असा बदल होतो, व ‘ य् आणि व् ’ ही पुढील स्वरांत मिळून पूर्णाक्षरें होतात किंवा त्यांचा लोप होतो. जसें—**मोदामहै आनन्देन**–**मोदामहायानन्देन**–**मोदामहा आनन्देन** । **कलौ इति**–**कलाविति**–**कला इति** ।

**टीप**—विसर्ग किंवा एखादें व्यंजन याचा लोप झाल्यामुळें एकमेकांपुढें येणाऱ्या स्वराचा सन्धि होत नाही.

## व्यञ्जनसन्धि

११ अन्त्य ‘ म् ’ पुढें स्वर आल्यास दोहोंचें मिळून पूर्णाक्षर होतें. जसें–**रामम् अपश्यत्**–**राममपश्यत्** ।

१२ अन्त्य 'म्' पुढें कोणतेंहि वर्गव्यंजन आल्यास 'म्' चा अनुस्वार होतो किंवा 'म्' बद्दल पुढील व्यंजनाच्या वर्गाचें अनुनासिक येतें. जसें–पुष्पम् पश्यति–पुष्पं पश्यति–पुष्पम्पश्यति। यत्नं करोति–यत्नङ्करोति।

१३ अन्त्य 'म्' पुढें श्, ष्, स्, र् व ह् हे वर्ण आल्यास त्याचा अनुस्वार होतो व य्, व्, ल् हीं व्यंजनें आल्यास त्याचा अनुस्वार होतो किंवा अनुनासिकयुक्त य्, व्, ल्, होतो. जसें—मित्रम् शंसति–मित्रं शंसति। मित्रम् लोचनाभ्याम्–मित्रं लोचना......मित्रँल्लोचना.......।

टीप—वाक्याच्या शेवटीं येणाऱ्या 'म्' चा अनुस्वार करू नये; 'म्' च लिहावा.

१४ अन्त्य 'न्' पुढें स्वर आल्यास व पूर्वी दीर्घ स्वर असल्यास दोहोंचें पूर्णाक्षर होतें. जसें–वृक्षान् उदकेन–वृक्षानुदकेन; परंतु पूर्वी ऱ्हस्व स्वर असल्यास 'न्' चें द्वित्व होतें. जसें अस्मिन् उद्याने–अस्मिन्नुद्याने।

१५ अन्त्य 'न्' पुढें च्, छ्, ट्, ठ्, त् व थ् हीं व्यंजनें आलीं तर 'न्' चा अनुस्वार व विसर्ग होतो व विसर्गाचा 'च्–छ्' पूर्वी श् होतो, 'ट्–ठ्' पूर्वी ष् होतो व 'त्–थ्' पूर्वी स् होतो. जसें–ग्रामान् चलति—ग्रामांश्चलति। अश्वान् ताडयति–अश्वांस्ताडयति।

१६ अन्त्य 'न्' पुढें ल् आल्यास 'न्' चा अनुनासिकयुक्त 'ल्' होतो. असें—अवदन् लोकाः–अवदँल्लोकाः।

१७ अन्त्य 'न्' पुढें ज्, झ् व श् हे तालव्य वर्ण आले तर 'न्' चा 'ञ्' होतो. जसें—देशान् जयति–देशाञ्जयति।

१८ शब्दाच्या शेवटी अनुनासिकावांचून इतर वर्गव्यंजन असून त्याचे पुढें स्वर किंवा मृदु व्यंजन आलें तर अन्त्य व्यंजनाबद्दल त्याच वर्गाचें तृतीय व्यंजन येतें. जसें—वनात् आगच्छति–वनादागच्छति। नगरात् बहिः–नगराद्बहिः।

१९ शब्दाच्या शेवटीं अनुनासिकाशिवाय इतर वर्गव्यंजन असून त्याचे पुढें स्वर किंवा मृदु व्यंजन आलें तर अन्त्य व्यंजनाबद्दल त्याच वर्गाचें तृतीय व्यंजन किंवा अनुनासिक येतें. मात्र तो पुढील अनुनासिकयुक्त शब्द प्रत्यय असल्यास अनुनासिकच येतें. जसें—अपश्यत् मण्डलम्–अपश्यद्म-ण्डलं किंवा अपश्यन्मण्डलम्। परंतु मृद् मयः–मृन्मयः (घटः)

२० 'त-वर्गाचीं व्यंजनें आणि स्' यांचा आणि 'च वर्गाचीं व्यंजनें आणि श्' यांचा सन्धि होतांना त् बद्दल च्, द् बद्दल ज्, ध् बद्दल झ्, न् बद्दल ञ्, आणि स् बद्दल श् असा फरक होतो, प्रासादात् जनं-प्रासादाज्जनम्। अस्मिन् शत्रौ-अस्मिञ्शत्रौ।

२१ 'श्' नें आरंभ होणाऱ्या शब्दांपूर्वी कोणत्याहि वर्गाचें अनुनासिकाशिवाय इतर व्यंजन आल्यास आणि 'श्' पुढें स्वर, अन्तःस्थ वर्ण, अनुनासिक किंवा ह् असल्यास 'श्' चा विकल्पानें 'छ्' होतो. जसें—तस्मात् शत्रोः-तस्माच्शत्रोः-तस्माच्छत्रोः। गृहात् श्वः-गृहाच्श्वः-गृहाच्छ्वः।

२२ 'त-वर्गाचें व्यंजन आणि स्' यांचा 'ट-वर्गाचें व्यंजन आणि ष्' यांच्याशीं संधि होतांना त् चा ट्, द् चा ड्, ध् चा ढ्, न् चा ण् आणि स् चा ष् असा फरक होतो. जसें—वृक्षात् डयन्ते-वृक्षाड्डयन्ते।

२३ 'त्' पुढें 'ल्' नें आरंभ झालेला शब्द आल्यास 'त्' चा 'ल्' होतो. जसें—अपश्यत् लोकः-अपश्यल्लोकः।

२४ कोणत्याहि वर्गाच्या अनुनासिकाशिवाय इतर व्यंजनापुढें कठोर व्यंजन आल्यास मागील व्यंजनाबद्दल त्याच वर्गाचें पहिलें व्यंजन येतें. जसें—विपद् पीडयति-विपत्पीडयति।

२५ 'ह्' नें आरंभ होणाऱ्या शब्दापूर्वी अनुनासिकाशिवाय इतर वर्गव्यंजन आल्यास, 'ह्' बद्दल विकल्पानें मागील वर्गाच्या व्यंजनाचें चौथें अक्षर येतें. जसें—धनिकात् हरति-धनिकाद्हरति-धनिकाद्धरति।

२६ 'छ्' च्या पाठीमागें ह्रस्व स्वर, 'मा' हें निषेधार्थी अव्यय आणि 'आ' हा उपसर्ग आल्यास, 'छ्' ला 'च्' हें व्यंजन जोडतात. आणि 'छ्' च्या पूर्वी इतर दीर्घ स्वर असल्यास 'च्' विकल्पानें जोडतात. जसें—वृक्ष छाया-वृक्षच्छाया। मा छेदय-माच्छेदय। परंतु लक्ष्मी छाया-लक्ष्मीच्छाया।

## विसर्गसन्धि

२७ विसर्गापूर्वी कोणताहि स्वर असून पुढें क्, ख्, प्, फ्, हीं कठोर व्यंजनें आल्यास विसर्गाचा बदल होत नाही. जसें—वृक्षः फलति। शनैः खनति।

२८ विसर्गापूर्वी कोणताहि स्वर असून पुढें च्-छ्, ट्-ठ्, त्-थ् ही कठोर व्यंजनें आल्यास विसर्गाचा अनुक्रमें श्, ष् व स् होतो. जसें--पान्थः चलति-पान्थश्चलति। नाविकाः तरन्ति-नाविकास्तरन्ति।

२९ विसर्गापूर्वी कोणताहि स्वर असून पुढें श्, ष्, व स् हीं कठोर व्यंजनें आल्यास विसर्गाचा बदल होत नाहीं, अथवा अनुक्रमें श्, ष् व स् होतो. जसें--रामः शंसति-रामश्शंसति।

३० विसर्गापूर्वी 'अ' असून पुढें 'अ किंवा मृदु व्यंजन' आलें तर विसर्गाचा 'उ' होतो व तो मागील 'अ' मध्यें मिळून त्याचा 'ओ' होतो व पुढील 'अ' चा नियम ८ प्रमाणें अवग्रह होतो. जसें--रामः अस्ति-राम उ अस्ति। रामोऽस्ति। रामः गच्छति-रामो गच्छति।

३१ विसर्गापूर्वी 'अ' असून पुढें 'अ' शिवाय स्वर आला तर विसर्गाचा लोप होतो. जसें--रामः इच्छति-राम इच्छति।

३२ 'सः व एषः' यांच्या विसर्गापुढें 'अ' शिवाय अन्य वर्ण आल्यास विसर्गाचा लोप होतो. 'अ' आल्यास नियम ३० प्रमाणें सन्धि होतो. जसें--सः-एषः गच्छति-स-एष गच्छति। परंतु सः-एषः अस्ति-सो-एषोऽस्ति।

३३ विसर्गापूर्वी 'आ' असून पुढें कोणताहि स्वर अथवा मृदु व्यंजन आल्यास विसर्गाचा लोप होतो. जसें--बालाः गच्छन्ति-इच्छन्ति-बाला गच्छन्ति-इच्छन्ति।

३४ विसर्गापूर्वी 'अ-आ' शिवाय इतर स्वर असून पुढें स्वर अथवा मृदु व्यंजन आल्यास विसर्गाचा र् होतो. जसें--बाणैः अरिम्-बाणैररिम्। गुरुः गच्छति-गुरुर्गच्छति। परंतु पुढील मृदु व्यंजन 'र्' असल्यास विसर्गाबद्दल होणाऱ्या 'र्' चा लोप होतो व मागील स्वर ऱ्हस्व असल्यास दीर्घ होतो. जसें:--हरिः रक्षति-हरी रक्षति।

३५ मूळच्या अन्त्य र् पुढें 'र्' नें आरंभ होणारा शब्द आल्यास वरील नियमच चालतो. जसें--प्रातर् रमते-प्राता रमते। पुनर्+रमते-पुना-रमते।

३६ ' भोन् ' या अव्ययापुढें स्वर किंवा मृदु व्यंजन आलें तर ' स् ' बद्दल आलेल्या विसर्गाचा लोप होतो. जसें--**भोः इह-भो इह । भोः गच्छत-भो गच्छत** । परंतु **भोः कृष्ण** ।

३७ अन्त्य ' म् ' पुढें कोणतेंहि अक्षर येवो वा न येवो तरी त्यांचा विसर्ग होतो. जसें—गच्छामम्-गच्छामः ।

३८ अन्त्य ' र् ' पुढें कठोर व्यंजन आल्यास अथवा कोणताहि वर्ण नसल्यास ' र् ' चा विसर्ग होतो. जसें-प्रातर्-कालः-प्रातःकालः । पुनर्-- पुनः ।